चॅनेल : अंडर द वर्ल्ड
(कवितासंग्रह)
श्रीधर तिळवे

प्रथमावृत्ती
२६ जानेवारी २००९


१६, बिल्डिंग नं. ५३, सी विंग,
नागरी निवारा परिषद- २,
फिल्मसिटी रोड, गोरेगाव,
मुंबई - ४०० ०६५.
मोबा. ९८९२२२९७३०

प्रकाशक / मुद्रक :
सतीश पाध्ये
शब्दवेल प्रकाशन
१३०३, अे, राजघाट रोड,
शिवाजी पेठ, कोल्हापूर.

मुखपृष्ठ :
अशुतोष आपटे यांचे मांडणशिल्प (इनस्टॉलेशन)
छायाचित्र : राजश्री आपटे

मुद्रण स्थळ :
गर्जना मुद्रणालय
१३०५, अे, शिवाजी पेठ, कोल्हापूर.

ऋण :
सचिन पारकर, प्रियवंदा नार्वेकर, अनिल घाडीगांवकर

विशेष आभार :
श्री. सुरेश माणगांवे, सौ. हेमा पलंगे
आणि गर्जना मुद्रणालयातील कुशल कर्मचारी.

किंमत : १०० रुपये

सौ. सुमंगला शांताराम तिळवे - नार्वेकर
उज्वला शांताराम तिळवे

आयुष्याच्या काळ्या बाजूची सावली
तुमच्यावर कधीच पडली नाही
ना पांढऱ्या बाजूची तिरीप

तरीही प्रचंड दुःखातही
एका अद्‌भूत शुद्धतेनं
तुम्ही तुमचं आयुष्य कसं जगलात / जगताहात
हा प्रश्न मला आजही सुटलेला नाही.

तुम्ही माझ्या सख्ख्या बहिणी आहात
ह्याचा मला अभिमान आहे.
तुम्हालाच

# बुलेट्स

## पहिला राऊंड : फिलॉसॉफर्स गन



## दुसरा राऊंड : चाळीतला घोडा



## तिसरा राऊंड : कलिम्ज स्टेनगन



## चौथा राऊंड : लेडिज गन

## पाचवा राऊंड : मिडलक्लास घोडी



## सहावा राऊंड : इनजेल सेल्फफायर्टींग



## सातवा राऊंड : कन्फेशनल गन



## आठवा राऊंड : बिझनेस गन



## नववा राऊंड : ग्लोबल मशिनगन

# चॅनेल : अंडर द वर्ल्ड - श्रीधर तिळवे

## पहिला राऊंड : फिलॉसॉफर्स गन

### इन द बिगिनिंग

देव दुनिया बनवत होता तेव्हा

आंधळे वाजवत होते त्यांचे डोळे
बहिरे त्यांचे कान

मुके बडवत होते त्यांच्या जिभा
पांगळे उडवत होते त्यांचे पाय

फक्त थोट्यानाच कळत नव्हतं
आपल्या हातांचं काय करायचं ते

देवानं त्यांना हातात घोडा देऊन
आपल्या दुनियेत पाठवलं

◆◆◆

## या वो जगह बता दे

आयुष्य अमर्याद आहे. आपल्या उपस्थितीची मर्यादा हीच आपल्यापुरती आपल्या आयुष्याची मर्यादा. दर्यामें खसखस म्हणून अशी खसखस व्हायचं जी दर्याभर भटकेल. सर्वांना वाटलं पाहिजे हा कुठेही असू शकतो. खरा टेरर त्यातून तयार होतो. लादेन कुठंही असू शकतो म्हणून लादेन लादेन आहे.

**जेबमें हथियार रखने दे जाहिद मुझे हर जगह हर पल**
**या वो जगह बता दे जहाँ कोई डॉन ना हो**

◆◆◆

## हत्यारं

हत्यारं नेहमीच शांत डोक्यानं राहिली जागच्या जागी. त्यांच्या पायांनी कधी चालणे स्मगल केले नाही की डोळ्यांनी कधी रंडीबाजार चालवला नाही. ती थकून कधीच शिरली नाहीत झोपेच्या बनावट अंधारात आणि पापाचा उजेड चावून कधीच पश्चाताप पावल्या नाहीत त्यांच्या अक्कलदाढा. ती बोलत राहिली त्याच माणसाची भाषा ज्याचा वरद हात त्यांच्यावर पडत राहिला आणि निकामी झाली तेव्हाही ती कण्हली नाहीत मोडकळीस आलेल्या दुःखी शब्दात.

त्यांनी सिद्ध केला आमचा चंचल रक्तपुरवठा
त्यांनी धगधगत ठेवला
आमचा कानफाट्या मोबाईल

•••

## ढेप

ही लाल रक्ताच्या गुळाची ढेप जोवर गोड लागतीये मुंगळ्यांना तोवर सर्व काही काळात तंदुरुस्त आणि फीट. हिचा चहा प्यायला काळजं आतूर आणि मुंगळ्यांना संख्यात्मक मरणच नाही.

प्रत्येकजण हिचा गूळ काढत गुळवणी ! ढेपेच्या हातावर मुंगळ्यांचा ढीग आणि मुंगळे न लाजता सरकतायत *हातातून हाताकडे !* ढेप संपतीय आणि ढेपेखालून उगवतीये नवी ढेप फ्रेश रक्ताची.

•••

## आपुन भाई लोग

आपुन भाई लोग करता क्या है
व्हायोलिन को तोडता है फोडता है
और उसको व्हायोलिन बजाना कहता है

म्युझिशियन लोग अलग क्या करता है

आपुन भाई लोग करता क्या है
आदमीको मारता है
और उसको सुपारी लेना कहता है

पण्डित लोग अलग क्या करता है

आपुन खुल्ला बोलता है
दुनिया जंगल है
और आदमी दो पाँव का हथियारवाला जानवर

मार्क्सभी यहीच बोला ना श्रीधरभाऊ ?
हाथमे इन्सानियत ?

◆◆◆

## खोटं

डोळे हातांशी खोटं बोलतायत
पोट काळजाशी
पाय रस्त्यांशी खोटं बोलतायत
नाक कानाशी

इथून तिथून सर्वत्र मरून राहिलेला खोटेपणा ब्लड डोनेट करत
लोक अंडरवल्डवरचे सिनेमे बघतील नाहीतर काय करतील भाऊ ?

खरे अवयव तिथेच भेटतात ना भाऊ ?

•••

## कवी

श्रीधरभाऊ कविता वाचताना
एकदम भाईसारखे वाटत होते
आम्ही म्हणालोही
गॉगल चढवला की थेट दाऊद

क्रेन उचलताना पॉज घेतात तशी पॉज घ्यायची आदत आवाज उचलताना
बेडौल हातवाऱ्यात मस्तीचा डोळा कायम भुवईदार
प्रत्येक शब्दात सफरचंद नासलेलं
प्रत्येक विराम सापासारखा थंडगार

मग अचानक ते गायाला लागले सूर्योदयाला भिडणारं
चन्द्रासारखा शुद्ध झाला स्वर
आवाजातली दगडाची नक्कल गायब झाली
आणि आमच्या डोक्यानं खांदा सोडला
आम्ही सगळेच झालो खांदेदार पुतळे उजेड पाडणारे

दारू पिऊन नाचल्यावर सगळेच झालो सभ्य
आणि वाट पहात राहिलो
श्रीधरभाऊ कधी झोपी जातात त्याची
शायरची एवढी इज्जत तर ठेवलीच पाहिजे

श्रीधरभाऊ झोपी गेले तेव्हा
त्यांच्या डाव्या हातात होतं कबूतर
उजव्या हातात दगड
आम्ही त्या दगडावर ठेवला एकं लाल गुलाब
आणि दगडावर काळीज ठेऊन झोपून गेलो ताकयामत

त्या रात्री आम्हाला कविता कळली नाही
पण कवितेचा आवाज कळला

तो होता बिनडोक
पण खांद्यात घट्ट

•••

# फिलॉसॉफर

काही असतात डोक्यात
गुन्ह्यांनी बागायती शेती करणारे
त्याचे हात थेट कार्पोरेट कल्चरपर्यंत
रंगसफेदी करत

ते वर्तमानपत्रांची हेडलाईन्स लिहितात
आणि टिव्हीवाल्यांना बंद डोळ्यांनी फोन करून
आपली फोटोशाळा पाठवतात
त्यांच्या कपाळातून उगवतात नद्या
ज्यांच्यात मीठमीर्चीमसाला जास्त आणि पाणी कमी असतं

मी आहे गनचा काफीर आवाज
जो उमटताना
नाममुद्रा उमटवत नाही
शांततेत मर्डर करून
कोलाहलात नाहीसा होतो

लोक विचारतात
तूही कंपनीवाला का ?
मी "हो - नाही" काहीच म्हणत नाही

माझ्या मौनात
ज्यांना 'हो' ऐकायचा असतो
ते "हो" ऐकतात
'नाही' ते "नाही"

इतर टोळ्यांसाठी मी आहे एक डॉक्टर
जो हार्टअटॅक निश्चित असणाऱ्यांना
आधीच काळजात गोळी घालतो

माझे नाव कुठल्याच रेकॉर्डला नाही
आणि माझ्या गनला माझे धंदेवाले म्हणतात
'फिलॉसॉफर्स गन'

मी माणसे मारत नाही
मी फिलॉसॉफी झाडतो

•••

## शूटरसाठी उपदेश

कुणाच्याच घरातलं घड्याळ खरंतर कुठलंही घड्याळ मरणाची वेळ दाखवत नसतं. खरंतर मरणाला वेळच नसते. मरण मरण असतं. ते कुठंही लिहिलेलं नसतं म्हणून ज्योतिषांनाही माहीत नसतं ते कधी मरणार ते.

मरण माहीत असतं ते फक्त आत्महत्या करणाऱ्याला आणि आपल्याला ! खरंतर आत्महत्या करणाऱ्यालाही त्याची वेळ माहीत नसतेच. त्याला कुठं मरायची वेळ साधायची असते ? त्याला फक्त मरणच साधायचं असतं. तर मरणाची वेळ फक्त आपणालाच माहीत असते. तेही समोरच्याच्या ! ज्याला मारायचय त्याच्या ! आपल्यालाही आपल्या मरणाची वेळ माहीत नसतेच.

थोडक्यात काय आपण समोरच्याला मारत नसतोच. आपण फक्त त्याच्यावर आपण ठरवलेली त्याच्या मरणाची वेळ झाडत असतो.

तेव्हा जाताना दोन गोष्टी विसरू नकोस<br>
घोडा आणि घड्याळ

◆◆◆

## नापास

तो अंडवर्ल्डमध्ये नापास झालेला शूटर होता. त्याचा घोडा ! त्याचा नेमही ! मात्र त्याचा नेम एकदा चुकला की त्याला दिलेला घोडा लकी होतो आणि ज्याला तो मिळतो त्याचा नेम कधीच चुकत नाही अशी त्याच्याविषयी अफवा. त्यामुळे शूटर लोक कुणाला केवळ घाबरून सोडायचं असलं की हमखास नवा घोडा त्याला देऊन सुपारी पार पाडायची जबाबदारी त्याच्यावर टाकत. त्याचा हात नेहरूंच्यासारखा लांब आणि गुलाबी ! एकदा एका समाजवादी पुढाऱ्याला घाबरवण्याची सुपारी मिळाली म्हणून त्याला दिली आणि नजर चुकीनं त्याचा नेम बरोबर लागला. समाजवाद एका गिरणीपुढं कलींगडासारखा फुटला आणि हा रक्त पाहून इतका घाबरला की तिथंच बेशुद्ध पडला.

त्याला फाशीची शिक्षा झाली म्हणून मी त्याला भेटायला गेलो तर त्याच्या हाताचा गुलाबी रंग उडून चालला होता आणि लांब हातांनी तो दोन दिवसापूर्वीचा पेपर आजचा म्हणून वाचत होता.

आम्ही एकमेकाला भेटलो पण काहीच बोललो नाही. निरोप घेताना तो हात हाल्वत एकच वाक्य बोलला

**"मी नापास व्हायचा प्रयत्न केला आणि पास होऊन थेट फाशीत पोहचलो भाऊ."**

•••

## शून्य

१

जगातली सर्वात रहस्यमय गोष्ट : शून्य
ते गौतम बुद्धाला मान्य असते
आणि दाऊद इब्राहीमलाही

त्याला हाताच्या बोटावर मोजता येत नाही
मात्र ते एकाला जोडल्याशिवाय
हाताची दहा बोटे साजरीही करता येत नाहीत

ते अस्तित्वात असते
आणि तरीही ते अस्तित्वात असत नाही

त्याला कुणाचं काहीच जतन करावं लागत नाही
किंवा त्याला कुणाला काही पुरवावंही लागत नाही

त्याच्यामुळे सर्वांना भोकं पडतात
आणि तरीही ते सर्वांना खुलं असतं

त्याला हाताळता येत नाही
किंवा पायाळता येत नाही
त्याला मेंदूवता येत नाही
किंवा काळजताही येत नाही
ते सर्वांना दिसते
पण त्याला कुणाला न्याहाळताही येत नाही

त्याला केस नसतात
मात्र प्रत्येक डोक्यावरून
ते कंगव्यासारखं फिरत असतं

त्याला ना आंधळं होण्याचं भय असतं
ना बहिरं होण्याची भीती

आयुष्य त्याला अस्तित्वात आणू शकत नाही
आणि मृत्यू त्याला नाहीसं करू शकत नाही

ते फक्त असतं
किंवा नसतंही

२

शून्यामूळे अनेक गोष्टी अस्तित्वात येतात
नाहीसं होण्याचं भय
मनाला आपण शून्य आहोत अशी सतत बोचणारी क्षुल्लकगिरी
ह्या विश्वामागे काही रहस्य आहे असं फिलींग
आणि अंडरवल्ड आणि मृत्यू आणि.... आणि.... आणि....

प्रत्येकजण शून्याच्या कैदेत आहे
आणि कुणालाच माहीत नाहीत शून्याच्या सीमा

३

जे निर्माण झालेलंच नाही
ते तिथं आहे की नाही ?
ते निर्माण झाल्यावर काय करणार आहे ?

जे निर्माण झालेलंच नाही
ते निर्माण झाल्यावर कुठं जाणार आहे ?

कुणालाच येत नाही कसलाच अदमास
आणि प्रत्येकजण मांस वाढवत वाढवत बसलाय mass

शून्य : ज्याची त्याची वेटींगलिस्ट आणि मार्कलीस्टही

४
शून्यात
सगळं जग टायटनिकसारखं हिंडतय
शून्यात
सगळी माणसं हात हल्वतायत

शून्य
सिग्नल पाडत
कंट्रोल करत
पेट्रोल करतय
आख्खा ट्राफिक
५
शून्य
प्रत्येक पॉझिटीवची निगेटीव स्पेस

शून्य
प्रत्येक कोल्ड वॉरचा गरम मध्य

शून्य
प्रत्येक काळ्या उभारावरचा पांढरा तीळ

शून्य
प्रत्येक शक्यतेचा सफेद डेड एन्ड

शून्य
तुमची इच्छा असो वा नसो
तुमचा थांबा
६
शून्याला सावली नाही
आणि माणसं तयार करतायत त्याच्यापासून सावल्या

शून्य हे कदाचित एकमेव क्रियेशन आहे
जे नाहीये
आणि तरीही ज्याच्यापासून उत्पादन होतंय

शून्य
माणसाचा कदाचित मूळ चेहरा
कदाचित शेवटचा

•••

# इलाका

कितीकाळ असं बेडवर पडून
स्वतःलाच नजरेनं हाताळायचं ?
ह्याक्षणी
कुणी आपल्यालाच नाण्यासारखं आकाशात उडवलं
तर काय पडेल ?
पोट की पाठ ?
काटा की छापा ?

मांसाचा हा गलेलठ्ठ लगदा
उत्क्रांतीला मिळालेला अनुनभवी ट्वीस्ट
चर्मत्काराचं शेपूट गळून प्राप्त झालेला चमत्कार

काळजाचा मध्य थाडथाड उडतोय
त्याला ना मेंदू लागतो ना पोट
रक्त शिवणाऱ्या वाहिन्या गल्लोगल्ली

साला ह्या शरीराचा असली डॉन कोण ?
आणि ह्या शरीराचं अंडरवर्ल्ड
कुठं कुठं आणि कसं कसं

डोळे उघडतायत/ मिटतायत
त्वचेच्या पोलिसी भिंतीवर आदळून
जी आपलंच नाणं आपल्यालाही पूर्ण पाहू देत नाहीच
आत काय चाललंय काय नाही कुणास ठाऊक

आपणासाठी फक्त नजरेचा उथळ इलाका
डोक्यावरच्या केसापासून सुरू
पायांच्या बोटापर्यंत खतम

•••

## पण उलट्या पावलांनी

डॉन कॉर्लिऑन फक्त पुस्तकात वा फिल्ममध्येच शोभतात. इतका तत्वनिष्ठ माणूस न्यायाधीश होऊ शकतो गॉडफादर नाही. आणि ते अंमली पदार्थाचं डील.... डॉन ते उधळत नाहीत. डॉन स्वतःच शेतकऱ्यांना पैसे देऊन वा जबरदस्ती करून शेती करवतात.

तेव्हा नितीमत्तेचा काटा मोडूनच हे घड्याळ चालवता येत असेल तर बघ.

तुरुंगाचं भय बाळगू नकोस. डॉन कुठेही असले तरी तुरुंगातच असतात. लोक सर्वत्र आहेत आणि त्यांनी नेमलेले पोलिसही. अमर्याद बेकायदेशीर ताकद ही फिल्मी अफवा आहे. लोक पूर्वी महारोगाला घाबरायचे आता अंडरवल्डला घाबरतात.

आता ह्याला ताकद समजणारे लोक आहेत पण मूर्ख लोक कुठल्या क्षेत्रात नसतात ?

तेव्हा बघ
अनुभवानं सांगतो
इथं आयुष्य वायाच जातं
इतरत्रही ते तसंच जातं का
मला माहीत नाही
पण उलट्या पावलांनी
फक्त इथंच

•••

# दुसरा राऊंड : चाळीतला घोडा

## चाळ

चाळीत शिरताना विस्कटलेल्या इस्त्रीच्या सुरकुतीदार शर्टात शिरावं तसं वाटत होतं चाळ जी काळजावर बाग ठेवून बांधली गेली होती डॉन उगवण्यापूर्वी हळूहळू वाळत गेली आत्महत्येत आणि दगडीही झाली जेव्हा लोक त्या आत्महत्येला घाबरू लागले.

सूर्य पिवळ्या खडूनं लिहू लागला इथं सकाळ चंद्र काळ्या खडूनं रात्र. देवीच्या आरत्या होतांनाही तिचा वाघ डॉनच्या समोर कागदासारखाच दिसू लागला तर ती व तिच्या हातातला त्रिशुळ पोस्टर काढण्यापुरतीच घेतलेली पोज होती का काय अशीही शंका यायला लागली.

लोक विटामागून विटा रचत राहिले शवांच्या ! त्यांच्या हातांना ते जातील तिथे येऊ लागला रक्ताचा वास. जो राजकीय अत्तरं लावून आटोक्यात ठेवण्याचाही प्रयत्न होऊ लागला. चाळ चाळ राहिली नाही किल्लाच झाली आणि पन्टर्स झाले भाईची इलाकाभक्ती करणारे सोल्जर्स. जाड्या भरड्या हातात चमकायला लागली जॉनीवॉकर आणि भांगेचा डोस तर प्रत्येक सुपारीबरोबर वाढतच गेला तुळशी आठवत.

आता ह्या चाळीत शिरतोय तर ना माझे ते जुने मित्र दिसतायत ना ती घरं ! लोकांच्या चेहऱ्यावर चाळ दिसत नाहीये मात्र त्यांचे हात जखडलेले दिसतायत इथल्या प्रत्येक गुन्ह्याशी आणि प्रत्येक डोळ्यात आहे आपण भाईचा माणूस आहे ह्याचा अभिमान.

मी काय शोधायला आलो होतो ? मी इथं काय शोधतोय ? मी आठवण्याचा प्रयत्न करतोय.

> आणि लोक माझ्या काळजातून कुठेही जातायत विदाऊट लायसन.
> चाळीने दिलेली चावी कुलुपात वाजवत.

•••

## नवरात्र

डाव्या अंगाला गायक उजव्या अंगाला गायिका
एक महिषासूर एक महिका
माईक आवाजाची बाईक फिरवत लोडेड
स्टारडम डमडमाडम

आयला हिचे बॉल गाताना फुगतात का रं
आयला त्येच्या गोट्या गातांना जुगतात का रं

कसली नवरात्र कसली आयवा
भाईच्या पूजेला सगळ्या रंडवा

काढ मावा गड्या काढ मावा

◆◆◆

## काळजी

भाईचं हात टापलं गेलं गब्बरसारखं पोलिसी बूटाकडून
तर आपलं काय व्हुईल गड्या
आपलं शर्ट आखूड व्हतील की लांब ?

आपल्या कोरड्या गळ्यात शिरलं
कायद्याचं अवघं तानसा धरण
तर आपली दादागिरीची भाषा
ताठ होईल की माठ ?

आपल्यासारख्या चवल्या पावल्यांनी
फडफडवू नयेत अशा नोटा पन....

काळीज काळीज हाय गड्या
रक्ताचं मिटर चालू
तवर म्या हायच

भाई सोडून जाईल दगडी चाळ
आनि सेटल होईल जेलच्या ओफिशियल मेटलात
तवा आपन असंच हसू गालातल्या गालात
की रडू ऊन ऊन
डोळं हातात घेऊन ?

•••

# पूजा

पुजारी
सत्यनारायण घालतोय
उजेडाच्या घट्ट दबावात
सूर्य
माणसासारखा दिसणारा
थोडा देवासारखा वाटू लागलाय

पुजारी
माझे क्रिमीनल हात हातात घेऊन वाढतोय तीर्थातून
उन्हाळे, हिवाळे, पावसाळे - पुण्याचे

माझ्या बोटांतील अंगठ्यातून चमकतायत
कन्फेशनच्या विजा

गुन्हेगारीतून आलेला सुगीचा हंगाम
शीळ घालत चाललाय निरंजनातून

पुजारी म्हणतोय "म्हणा"
मी तो जे म्हणतोय ते म्हणतोय
अर्थाशी अर्थाअर्थी संबंध नसलेले मंत्र
केवळ संस्कृतमुळे सुसंस्कृत वाटतायत

गर्दी
पूजेवर विश्वास असणारी गडद होतीये

एक वेडा
घोडा घेऊन सत्यनारायणापुढे नाचतोय
भाईचा भाऊ
त्याला हाकलावा तरी पंचाईत

गोळ्या सुटतायत
आणि पूजेला भोकं पडतायत
देव वहात चाललाय फरशीवरून
त्याचं कटलेलं मुंडकं
कटींग चहा पीत
गप्पा छाटतय
माझ्या छप्पनगुणी सुऱ्याबरोबर

माझा हात हलका होत मिचकावतोय
स्वतःची निमुळती बोटं

दक्षिणेतून उत्तर

◆◆◆

# ज्योतिष

हे नशीब एका हातावरच्या फुग्यातून जन्मतं ठाकूर
जिथून रेषांचे झरे उगवतात

ही आयुष्यरेषा
थेट खाली धावतीये रक्ताच्या नदीसारखी ठाकूर
तिच्या काठी कित्येक मर्डरर्स अंडी घालतायत
पाच बोटातून निघतायत पाच किंचाळ्या
मंगळाच्या पठारावर आहेत साठ फायरींगज
आणि हा जो तारा चमकतोय
तो बायकोच्या मृत्यूचा आहे

हा शुक्राचा उंचवटा कित्येक डान्सबार नाचवतोय ठाकूर
आणि ही जाळी
आठ दहा बलात्कारांनी बनलेली आहे

ही विवाहाची रेषा अस्पष्ट आहे
वाळवंटात नदी नाहीशी व्हावी तशी गुप्त
कदाचित हाताखालून निघून
थेट काळजापर्यंत पोहचली असेल
हार्टअटॅकची ग्यॅरंटी थेटच दिसतीये तिच्या
क्रॉस गेलेल्या रेषेवरून ठाकूर

बुद्धीरेषेत तर चक्क तांबं वितळलेलं दिसतय
तिचे सुऱ्यासारखे टोक धारदार आहे
गर्द आणि तांदूळ समबुद्धीने समाजात वाटाल ठाकूर

हृदयरेषा पूर्वी असावी असं वाटतय
आता जी खळी उरलीये तिथं असावी एक
रक्ताची लांबलचक सिगरेट

आता दिसतीये फक्त एक थोटूकली
चार पाच झुरक्यांची गॅरंटी अजूनही दिसतीये ठाकूर
आता पुढचं तुम्ही बघा

तुमचा हात माझ्या हातावर इमोशनली कशाला ठेवताय ठाकूर
अहो मी कवी तुम्ही डॉन
आपल्या नशिबाची अदलाबदली थोडीच होणारय ?

अहो कवी लोकं फक्त त्यांनाच
माहीत असलेली भविष्य सांगतात ठाकूर
माहीत नसलेली भविष्यं अस्तित्वातही नसतात
आणि खिजगणतीतही

•••

## बदल

भाई
तुरुंगातून परतला तेव्हा
ओठावर होती पॉलिटीकल सफेदपोश मिशी
आणि डोक्यावर गांधी टोपी
जिच्यावर रक्त सांडल्याची जखम होती

त्याच्या छातीत होती
पाकिस्तानच्या गनमधून झाडलेली हिरवी गोळी
बहुधा AK-47 मधून आलेली
किंवा ब्लॅक स्टॅल्यिनमधून बरसलेली

तो आला तेव्हा
त्याला तुरुंगातले तपशील आठवत नव्हते
मात्र त्याचा श्वास नवा कोरा होता

तो अनेक पक्षांवर बोलत होता
मात्र अधूनमधून एनकाऊंटरमध्ये झोपी गेलेले चेहरे
त्याला अस्वस्थ करत होते

गुन्ह्यांना राजकीय रंग देण्याची वेळ आलीये
आणि डॉन लोकांना आता पब्लिक पाठिंबा वाढतोय
हे त्याचे दारूच्या प्रत्येक ग्लासाच्या शेवटच्या घोटातले भरतवाक्य

"ही शेवटची लढाई जिंकली
की दिल्लीवर डॉन राज्य करेल
मग लोकांना कैदेत ठेवू
गुन्हेगारांना घरात"

त्याला तुरुंगातही कशी घरगुती ट्रिटमेंट मिळत होती
हे तर तो हसत हसत सांगत होता

त्याची इंद्रिये मरत चाललीत
हे त्याचे शरीर वाचताना आम्हाला स्पष्टच कळत होते
मात्र त्याच्या मेंदूला वयाची कोरड पडली नव्हती

त्याची स्पर्श करण्याची ताकद संपली होती
आणि त्याच्या हातांना
आमचे हात सापडताना
वेळ लागत होता

आम्ही शेवटचे एकत्र चाललो तेव्हा
भर पावसातही पायांना ओल लागू नये म्हणून
त्याने चढवले होते संपूर्ण शरीराला फीट बसणारे बूट
आणि तो विमानात बसला तेव्हा
त्याचे डोळे आमच्याऐवजी
दिल्लीतल्या ढगावर खिळून होते

भाई उडाला
तेव्हा प्रत्येकाच्या डोळ्यात आदळले
कधीकाळी एकमेकाला सांगितलेले जोक
आणि आम्ही आठवणीत हसणार तोच
आमची बत्तीशी
विमानाच्या आवाजाने घश्यात जात होती

भाई सिंहासनावर बसला तेव्हा
भाईच्या दरबारात होती
तरुण सळसळती नवरत्ने
आणि त्याच्या सिंहासनाखाली थरथरत होती
आमची तोंडघशी पडलेली
सिंहासनबत्तीशी

•••

## त्या रात्री

सकाळी सकाळी
नशिबाचे घोडे धावले हाताच्या तबेल्यातून
थेट आयुष्याच्या रेसकोर्सवर

विचार करून करून पायात आलेल्या मुंग्या
तुरतुरल्या थेट मेंदूतल्या पृथ्वीमध्याकडं

टिव्हीच्या अँटेनावरची झुरळं
झुरझुरली थेट सूर्य गिळायला

एकाच वाटाघाटीच्या टेबलावर बसले
हिटलर आणि बुद्ध

वाटलं की तिकीट मिळालंच
आणि अचानक रात्री
डिसकनेक्ट झालं मोबाईलचं तुणतुणं

एका पॉलिटीकल फोनने
तुकडे तुकडे केले भाईच्या अजस्त्र कानाचे
आणि भाई बहिऱ्या होत चाललेल्या जगाकडे
एकटाच चालत राहिला एकटाकी

त्याच्या पावलाचा आवाज
तो सोडून
सगळ्यांनाच ऐकू येत होता
आणि त्याला शत्रूची राजकीय बदचाल
ऐकू येत नव्हती

एका असहाय्य अगतिकतेनं
भाईनं ब्रेललिपीतून हिटलीस्ट काढली

आणि तो गोळ्या झाडत राहिला त्या दिशेनं
ज्या दिशेला साधं काळं कुत्रंसुद्धा उभं नव्हतं

त्या रात्री आम्ही भाईला
स्वतःचंच नाक कापताना पाहिलं
आणि सोसत राहिलो
आमच्या श्वासावर झालेला राजकीय परिणाम

त्या रात्री आम्हाला कळलं
शेवटी सगळे भाई
नामधारी असतात

त्या रात्री आम्ही
पॉलिटीकली करेक्ट झालो

•••

## भाई

भाई मेला ह्याचं दुःख नाही
पण पोलीस सोकावले ह्याचं दुःख आहे

डोक्यावर स्वर्ग कधीच तरंगत नव्हते
मात्र लाईट ऑफ करताना भाई काही नरक
ऑफ करण्यात वस्ताद होता

आम्हाला सगळ्याच भाषा परदेशी वाटायच्या
भाई मात्र सगळ्याच भाषा मायबोली असल्यासारखा बोलायचा

एक पाशवी जनावर
ज्याला भय माणसाळवू शकलं नाही
सतत भाईच्या डोळ्यात

त्याची पापणी उठली की टेरर उठायचा
त्याची पापणी झुकली की टेरर झुकायचा

पक्या म्हणायचा भाईला
तेरी आँखोके सिवा दुनियामे रख्खा क्या है ?

◆◆◆



Scanned with CamScanner

# तिसरा राऊंड : कलीग्ज स्टेनगन

## म्हातारे

गुन्हे करून करून थकून गेलेले दोन म्हातारे. हात इतके निर्जल की पाणी पितानाही आत्महत्या करतायत असं वाटतंय.
त्यांच्या सिंहासनावर इतिहासाची लांबलचक सावली जिची दाढी सावलीतही पांढरी आहे हे कळतंय.
पोलिसांना कसा चकवा दिला त्याच्या असंख्य आठवणी. खोटे साक्षीदार तयार करण्याची अस्सल पद्धत.
घंटा वाजतायत मृत्यूच्या घड्याळाच्या टिकटिकीत. जोमाला फाशीची शिक्षा जोश जन्मठेपेत पण रुबाबदारपणाचा कैफ जागच्या जागी खिळून.

पाय सिंहासनापासून सुरू होतायत
आमच्या काळजापाशी संपतायत

मालीश करून चकाचक ठेवलेलं अंगही थरथरतय पण रमी खेळण्याचा शौक कमी होत नाहीये.

पत्यातील मजकूरही उडत चाललेला
एक्का एक्का नाही राजा राजा नाही

आम्ही उठून चाललोय कंटाळून
आणि म्हातारे कार्डस पिसींग अँड पिसींग अँड पीसींग....

•••

## नायक

नायक मारायला निघाला की
सैनिकासारखा दिसायचा
आम्ही चेष्टेनं त्याला म्हणायचोही
"सोल्जर"

त्याचाही हात आमच्याप्रमाणेच थरथरायचा
पिस्तुल उचलताना
पण तो हसायचा तेव्हा अख्खी हवा हसायची

तो ड्रायव्हिंग व्हीलवर बसला
की रस्ते त्याच्या बोटावर नाचायचे
आणि त्याच्या काळ्या घड्याळात
तो मृत्यू वाचत असल्यासारखा
वेळ वाचायचा

वाटेत विचित्र खडक उगवायचे आकस्मिक तेव्हा
नशिब कोसळायचं त्याच्या नजरेतून
आणि तो त्या नशिबाला जीभ काढून हसायचा

"मृत्यूचं चुंबन भेकड घेतात
मैं तो मौतपे भी रेप करके अमर हो जाऊंगा"

हे म्हणताना त्याच्या आवाजात कॅडबरी असायची
आणि तो ती घोळवत
घोडा हाताळायचा

तो बायकांना 'छप्पन टिकली सोसायटी' म्हणायचा
का ते त्यालाच ठाऊक

भाईनं जेव्हा त्याला एका बाईला मारायची
ऑर्डर दिली तेव्हा तो करवादला
"औरतपे तो हिजडे हाथ उठाते है
मै ये सुपारी नही लूंगा"

तरीही भाईनं प्रेशर आणलं तेव्हा
तो अडखळत पुतळ्यासारखा उभा राहिला
नामर्दानगिचा एक फ्लॅश सगळ्यांच्या कपाळावर चमकवत तो पुटपुटला
"आजकाल अपने धंदे की तकदीर गांडू लोग लिख रहे है
वो पांडू उधरसे ऑर्डर देता है
और भाई इधरसे सुनता है"

दुसऱ्या दिवशी ती बाई नागडी सापडली तेव्हा
तिचे बॉल उघडे पण डोळे मिटलेले होते
तिच्या छातीवर उघडी पडली होती
नायकची लाडकी पिस्तोल
आणि न उडालेल्या गोळ्या

त्यानंतर नायक कुणालाच सापडला नाही
सापडली ती फक्त नायकची जीप
तिचे आरसे कुणीतरी काळजीपूर्वक काढून नेले होते

•••

## दुनिया

ओठावर साखर ठेव
पोटामध्ये गन
दुनिया कधीचीच भाडमे गयी है

कसली नीतिमत्ता कसला विवेक
येऊन जाऊन सारे इथे स्वार्थाचे लेक

ईश्वर ही भाडखाऊ लोकांनी
पोट भरण्यासाठी शोधलेली भाडोत्री शंकरशाळा

कुठला स्वर्ग कुठला नरक
माणूस हा स्वतःच्या गांडीमध्येच मारतो झक

जग मार फाट्यावर
उभार तुझे लिंग
प्रेम म्हणजे सेक्सी रुपयातल्या
चार आण्याची झिंग

पोलीस विकत घे
कायदा विकत घे

नोटांमध्ये गळून पडतात साऱ्यांच्याच मिश्या
पतिव्रता बनतात इथं वेश्या वा वेड्यापिश्या

आण बाबा कांडी दे घेऊ झुरका सडा
जिंदगीकी हर फिक्र धुएमे उडा

मर भैच्योंद
या जल जा
ये सिमसिम लडकीके माफीक खुल जा

हटा सावनकी घटा
दुनिया आख्खी फटेली है इसमें
तू भी फटा मैं भी फटा

•••

## गांड कुणाची लागलेली नाही

गांड कुणाची लागलेली नाही
वाट कुणाची लागलेली नाही

जो तो वितळून गेला पैश्यात

चिल्लर वाजण्याचे दिस गेले बाबा
शेअर वाजतायत
प्रेअरसमोर

ही खुल्लमखुल्ला टांग कुणाची
ही अब्दुलगुल्ला रांग कुणाची

जो तो लावतोय भांगेत तुळस
आता तुकोबाचा कळस
कंडोबा

ढील दे अडामतडाक
कडाकणी कडकडली ढीम्मकढीम दसऱ्यात
आणि सोनं पाहिलं काळ्या आरश्यात

उड ना
हो कटीपतंग
मांजाच्या गावाला ना उमंग ना तरंग

जंग खाणारी आयुष्यं गन उचलतात
आणि एनकाऊंटरला मरतात - सेलमध्ये -

अडकित्ता तडकित्ता गांडूमढूम बागूलबुवा
सगळीकडून फाटली पँट आता माझी गांडच शिवा

•••

## इंग्लिश

इंग्लिश हिरॉईन म्हणते
फक यू
आम्ही म्हणतो मग फक ना
कधी पँट काढून येऊ ?

इंग्लिश मदर म्हणते
गुडनाईट डार्लिंग
आम्ही म्हणतो
अग येडे काल रातच्याला तुझी पोर घेऊन आली
चार आण्याची झिंग

इंग्लिश फादर म्हणतो
बास्टर्ड
आम्ही म्हणतो
तुझी आय झवली
आता कितीही ओरड

रम्या म्हणतो
आयला इंग्लिशमध्ये बोलताना
मान्सं किती सेक्सी वाटतात
आम्ही म्हणतो
रम्या आरं म्हणूनच
इंग्लिश पिक्चर बघताना
आपली बुबळं ताठतात

•••

## चर्चमध्ये मर्डर झाला तेव्हा...

घोडा किंचाळला की  गोळी बाहेर पडते
एरव्ही तिला तरी कुठं सोडायचं असतं बंदुकीतलं स्वतःचं सुखासीन घर

डिसोझानं हात पुढे केले तेव्हा
त्याच्या हातावर होती शुभ्र शांतता
मला वाटलं प्रेअरचा समय
देवाच्या दारात कुणाला गुण्ड व्हायचं असतं ?

पण प्रार्थना करताना अडपोटात जाणवला
गरम रक्ताचा टिपिकल स्पर्श
आता डिसोझापुढचा येशू पाहू
की डिसोझाच्या हातातला सुरा पाहू ?

काही कळायच्या आत घोडा किंचाळला आणि मग....

•••

# चौथा राऊंड : लेडिज गन

## बायकोस

जग व्यभिचारी
म्हणून तर ही याहू पॉप्युलेशन

ईश्वराला 'एक' रहायचं असतं
तर इतकी मान्सं कशाला बनली असती

मी इकडून तिकडं आणि तिकडून तिकडं जातो
म्हणून करवादतेस कशाला

आपण राम नाही हे पहिल्याछूट भेटीत सांगितलं
होतं तुला

ज्यांना एक बाई पुरते
त्यांना एक बाई पुरते
आणि जे बाईला पुरून उरतात
त्यांना आख्खी पृथ्वीही पुरत नाही

ये
आणि कर जमीनदोस्त

•••

## प्रेयसीस

डोळ्यांनी कॉल दिला
म्हणून चेहरा डायल केला

आता माझ्या शरीराचा प्रत्येक कॉन्टॅक्ट
झोपी गेलाय तुझ्या त्वचेच्या नेटमध्ये
जागा आहे तो फक्त एक मुंगळा माझ्या वीर्यापासून बनलेला
जो अलगद पायांनी
तुझ्या गोऱ्या हाताचा हिमालय चढतोय
आणि तू त्याच्या प्रवासाबाबत उदासीन-झोपेत मग्न

तुझी कूस वळली की
तो अनंतात विलीन

मरण इतकं स्वस्त आहे ह्या जगात
हाताच्या अंतरावर

◆◆◆

## मजनू

मजनू अंडरवर्ल्डमध्ये आला
तेव्हा मजनू नव्हता
तो होता पक्का बिहारी
जो हार खाऊन आला होता

मग त्याला एक दिवस एका डान्सबारमध्ये लैला भेटली
लैला
जी दारू प्याली की कुराणावर बोलायची
आणि जिचा फक्त ॲपिअरन्सवर विश्वास होता

तीन दिवस मजनूनं तिचा पाठलाग केला
वेगवेगळ्या डान्सबारमध्ये
शेवटी तिला पकडल्यावर तिला विचारलं
"अपने जीवनकी उलझनको कैसे मै सुलझाऊ ?"
लैला खोल श्वास घेत म्हणाली, "मर"

मजनू गँगमध्ये परतला तेव्हा
दारूत त्याचं लक्ष्य नव्हतं
आणि सिगरेट त्याच्या तळहातावर मरण शोधत
ॲशट्रे समजून विझत होती

सकाळी मजनूची डेड बॉडी सापडली तेव्हा
रूमभर होती सिगरेटस्‌ची असंख्य थोटकं
जी किंचाळत होती
"लैला ! लैला ! लैला !"

आम्ही लैलाला बोलावलं
तिनं निदानं शेवटचं त्याला बघावं म्हणून
तर ती आली नाही
मात्र रात्रभर "दीपा" डान्सबारमध्ये एकाच गाण्यावर नाचत राहिली
"लैला मैं लैला लैला ऐसी हूँ लैला
हर कोई चाहे मुझको मिलना अकेला"
•••

## रशियन - १

ती नुकतीच इंडियात यायला लागलेली
त्यामुळे मी तिला ओळखत नव्हतो
फक्त तिचा राजस्थानी दलाल
माझा दोस्त असल्याने जानपहचान होती

तिचे हात हिमनदीसारखे वहायचे
आणि तिचे डोळे
पक्ष्यासारखे उडत यायचे
सोनेरी केसांचे पंख लावत

एके रात्री इंडियात ती आली कमाईचा कोटा कंप्लीट करायला
तर माझा मित्र नेमका गायब
आणि मी नेमका त्याच्या फ्लॅटमध्ये एकटा

गोरी रशियन कातडी
तिला रात्री नाकारायची कशी म्हणून मी आत घेतली
तर तिच्या गळ्याचा शंख फुंकत
ती "थेंक्स" म्हणाली

त्या रात्री मी लिहीत होतो
बाईच्या स्तनावर एक दीर्घकविता
आणि ती विचारत होती रात्रभर
"झाली ?"

मी कविता लिहितोय हे तिला कसं कळालं
मला कळालं नाही
मात्र मी लिहिताना डिटेक्टीवसारखा दिसत होतो
असं ती म्हणाली

रात्री आम्ही एकमेकांचे कपडे काढूनही काहीच केलं नाही
ती प्रवास करून थकली होती
मी कविता करून

सकाळी जागा झालो तेव्हा
तिच्या दोन्ही स्तनात होते माझे अखंड नाक
आणि मी लिहिलेल्या कवितेचे कागद
तिनं सहज म्हणून उघड्या ठेवलेल्या खिडकीतून
उडून जात होते
गोलाकार
सुटे सुटे

•••

## रशियन - २

आम्ही एकमेकाला कधीच म्हणालो नाही
"I love you"
मात्र आम्ही भेटलो की एकमेकाला मिठी मारायचो

तिचे सगळे क्लायंट इंडियन किंवा गोरे
आणि माझा लूक तर अस्सल आफ्रिकी
त्यांना वाटायचं
सगळं सोडून ही रशियन बया निग्रोच्या प्रेमात पडली कशी
तीही बुटक्या पाच सातवाल्या

आम्ही चालत जाताना
मुके घ्यायचो नाही
मात्र हातात हात घ्यायला विसरायचो नाही

तिचे स्पर्श मुके असायचे
आणि हात रिमोट नसलेले

तिच्या सात रंगाच्या ब्रा होत्या
आणि आम्ही भेटलो की मला अंदाजे रंग सांगायला
लागायचा कंपल्सरी

मी चूक की बरोबर
हे मला तिनं कधीच सांगितलं नाही
मीही विचारलं नाही

झोपताना
सगळे कपडे काढून झोपायची तिची सवय
आणि मला तर ऐन उन्हाळ्यातही
पांघरूण लागायचं

झोपताना तिचे ओठ उघडे पडायचे
आणि ती झोपेतल्या झोपेत कोणत्याही क्षणी
मराठी बोलायला लागेल असं मला वाटायचं

तिच्या डाव्या खांद्यावर होता ज्ञानेश्वरांचा कावळा
उजव्या खांद्यावर निळे कबूतर
तिच्या स्तनात मात्र मोर आहे
असा मला संशय यायचा

ती दुपारी धंद्याला निघताना
स्टॉकिंग्ज चढवताना
हमखास उदास व्हायची
पण माझी नजर खिळली की
हा हा हा हसायची

तिच्यामाझ्यात काय होतं हे आम्ही
एकमेकाला कधीच विचारलं नाही
आणि स्वतःलाही

शेवटच्या दिवशी विमानात चढताना
तिनं मला दिले
आतापर्यंत स्पर्शही करू न दिलेले
सात ब्राजचे पॅकेट
आणि जाताना म्हणाली
"जाळून टाक"

ती गेली
आणि मग रात्रभर तिच्या ब्रात जळत राहिले
माझे काळे हात

•••

## पाचवा राऊंड : मिडलक्लास घोडी

### मध्यमवर्गीय सद्यस्थितीत घर बांधताना

सद्यकालीन जगण्याच्या स्थितीत फक्त गुन्हे करूनच टिकता येतं आईच्या पोटात, बाईच्या ओठात, ताईच्या ताटात आणि अंगाईच्या थाटात ! सबब घराचं प्रॉडक्शन करताना करावा लागतो कागदांचा, काळजांचा, काळज्यांचा थोडाफार फेरफार ! ट्रिटमेंट म्हणून ही हेराफेरी चांगलीच असते सभ्य गृहस्थांसाठी ! त्यांनाही त्यातून कळतो ताठर युगाचा क्रिमिनल महाधर्म आणि कट्टर खोटा स्वभाव. खऱ्या सभ्यता फार नाजूक, मुलायम, हळव्या असतात म्हणूनच त्या टणक गालात वितळत नाहीत. त्यांचे अश्रू चमकदार असतात पण ते उमटवू शकत नाहीत टिकणारी युगमुद्रा ! शहाणी माणसे अशा सभ्यतेच्या वाट्याला जात नाहीत. कारण त्यात सभ्य गृहस्थ बनण्याचा धोका पत्करावा लागतो. त्यापेक्षा स्वतःचं शोषण करून थोडंसं प्रदूषण वाढवणं असतं हमेशा परवडेबल आणि टिकावू .

खोटी सभ्यता रचत जाताना खांदा निखळून पडत नाही, धंदा वाढतो, चंदा द्यावा लागतो पण पाय वितळत नाहीत आणि मुख्ये म्हणजे

घर
उभं
रहातं

अशुद्ध भिंती पातळ असतात आणि पाणी असतं जड ! नळात आपलंच रक्त वाहताना दिसले तरी डोळे त्याला आभास समजण्याइतके सरावलेले असतात आणि घर बांधून आपण झोपतो घरात तेव्हा आपल्याला लागते अन् लाभते आपल्याच घराची झोप.

आपल्याच उपजावू एफ. एस. आय. मध्ये
आणि आपण जागे होतो तेव्हा उगवतात
हिऱ्यांनाही कापत जाणारे काचेरी डोळे
आपल्याच अंडरवल्डमधून - स्पॉन्सर्ड
कल्चर्ड मोत्यांसारखे

•••

# भाडं

लाकडी पक्ष्यांना पुरतो मुठभर वारा
आपले हात असे
की त्यांना सुपरमॅन होण्याची स्वप्ने पडतात

चित्रकार कॅनव्हास रंगवतायत
बायका नेलपेंट लावतायत
आणि जाहिरातदार एशियन पेंटस शूट करतायत

आमचं जग शहाणपणापासून बनत नाही
मात्र ते भयातून छत्रीसारखं उमलतं

त्याच्या केबल्स टाकत आम्ही पोहचतोय
तुमच्या सभ्य घरात
आणि तुम्हीही देतायच की
क्यूँ कि साँसभी कभी बहू थी म्हणत
दर महिन्याला
जंटलमन राहण्याचं भाडं

◆◆◆

## स्पर्श

सामान्यांना स्वप्ने पडतात असामान्यत्वाची
असामान्यांना स्वप्नात दिसत राहतो
त्यांचा सामान्यपणा

असामान्य पळत राहतात ! स्वप्नांना घाबरून रिॲलिटी कनवर्ट करत राहतात !
ती स्वप्नात येईल ह्या भयाने

स्वप्नांना डोळ्याबाहेर काय ह्याबद्दल फार उत्सुकता असते
त्यांना डोळ्याबाहेर पोहचायचे असते
पण ती डोळ्यापर्यंतही पोहचू शकत नाहीत

त्यांच्या डोळ्याबाहेर पोहचण्याच्या धडपडीलाच लोक स्वप्न समजतात.

प्रत्यक्षात स्वप्नामागे जे खरे स्वप्न असते ज्याला डोळ्यापर्यंतही पोहचता येत नाही

तेच असते खरे स्वप्नाचे जग

त्याला नख जरी लागले तरी नरक बाहेर येतो. त्या स्पर्श झालेल्या जागेतून !

मी अंडरवल्डला भेटतो तेव्हा त्या स्पर्शाला भेटतो.

•••

# सुई

तुम्हाला कुणी सांगितलं
की आम्ही भिखू म्हात्रेच्या भाषेत बोलतो

तुम्हाला कुणी सांगितलं
की आमच्याकडे डिगऱ्या नसतात

होतं काय की आमच्या काळजात असते एक सुई
आणि तिच्या बदल्यात आम्हाला हवे असते
अवघे हस्तिनापूर आणि इंद्रप्रस्थही

आता हा सौदा कुणाला परवडणार ?

त्यामुळे जिथे जिथे तुमची कुरुक्षेत्री भोकं
तिथे तिथे आमची निरंतर शिलाई

लक्ष्यात ठेवा
श्रीकृष्णाच्या विश्वरूपदर्शनात सुई नव्हती

•••

## फाळणी

पार्टिशन होण्यापूर्वी आख्खी फॅमिली एका देशात रहायची. एक डॉन पंचा नेसून राज्य करायचा तर एक डॉन जो पुरा डॉन झाला नव्हता आणि ज्याला आपण कंप्लीट डॉन नाही ह्याचं शल्य होतं सूटबूट घालून फिरायचा.

सुटाखाली वाघ होता जो हरणं खाऊन ढेकर द्यायचा आणि बुटाला विचारायचा

"इंडियाका किंग कौन ?"
बूट म्हणायचे, "पंचा."

वाघाला ह्याचं वाईट वाटायचं. त्यानं पंचाची इनवेस्टीगेशन मोहीम हातात घेतली पण पंचात काहीच नव्हतं ना सिंह ना चित्ता.

बूट विचारायचे, "काय शोधतोयस ?"

सूट म्हणायचा, "ह्याच्या पंचात मांसाहारी कुणीच कसा नाही ?"

बूट म्हणायचे, "काय कुणास ठाऊक ?"

सूटानं शेवटी काही गूढवाद्यांचा सल्ला घेतला तर ते म्हणाले, "आख्खी सल्तनत तुझ्या तकदीरमध्ये नाही." मग सूट किंचाळत राहिला. "अर्धी सल्तनत ! अर्धी सल्तनत !"

शेवटी कंटाळून पंचा पार्टिशनपाशी जाऊन उभा राहिला आणि म्हणाला, "जे ईश्वराच्या मनात आहे ते होईल." त्यानं लिहिलं भिंतीवर अखंड ईश्वराचं कागदी गाणं आणि तो पहात राहिला एक समांतर डॉनशीप

सुटाबुटातून उभी राहताना
वाघाच्या पोटात जाताना

•••

# सुपाऱ्यास

आमच्या हत्येची सुपारी घेऊन फिरणाऱ्या सुपाऱ्या,

ऐक तुझ्याच बंदुकीतील गोळ्यांच्या शरीरातील पानांची सळसळ आणि त्यांच्या पानगळीचं दुःख.

ऐक खूनी शांततेमधले मरण पावणाऱ्यांचे शेवटचे कॉल.

ऐक माणसे विखरून पडताना त्यांच्या काळजातून कोसळणाऱ्या एफ. एस. आयचा आवाज.

आम्ही कष्टाच्या घामात हात धुतो
आम्ही आयुष्याच्या धुळीत तोंड खुपसतो

तुझ्या शर्टाची उघडत जाणारी बटणं पळपुटी छातीच दाखवतात जी कष्ट करायला घाबरत होती आणि जिचा प्रामाणिकपणा गरिबीला बुजला

माणसे जनावरांप्रमाणे मरतायत सर्वत्र

माणसे ज्यांना मरणापूर्वी स्वतःच्या घरात परतायच होतं. ज्यांचा बायकोच्या प्रगाढ छातीवर गाढ विश्वास होता.

हे आक्रोश करणारे हात बघ
ह्या फुटलेल्या बांगड्या बघ

कुठल्या झाडाला सोनं लागलं बाबा
ज्याला त्याला ज्याची त्याची मातीच पुरली
शेवटच्या श्वासापर्यंत

तुझ्या बंदुकीत एक साधेपणा ठासून भर आणि बघ

आकाशात वेगवेगळे पतंग उडताना
जिंदादिल आणि ढगांना कीस करणारे

•••

## भय

कधीही मरू ह्याचं खोलवर रुतत चाललेलं भय ! कितीही कपडे चढवले तरी ठणठणीत नागडं! भय बोलतय कावळ्याच्या कर्कश आवाजात.भय काळजातला एकेक बल्ब बहादुरीनं टिकलेल्या विझवत चाललंय. भयाचा चेहरा दुरुस्तीपलीकडं गेलाय. भय कागदाच्या साध्यामोळ्या आवाजातही फडफडतय धूर्ततेचे साऊंड इफेक्टस देत ! त्याचं नेचर कळत नाही मात्र खिशात हात घातला तरी खिशातही ते असल्याचा संशय येतोय प्रत्येक बोटाला.

भय स्वतःचं डोकं टायटनिक ठेऊन मंदिराच्या पताकेवरही भगव्या वादळात वावरतय. भय टॉप टू टो सूट घालून डाउन टू अर्थ नजरेनं पृथ्वीवर चालत जातय. साऱ्या शरीरातून आरपार! सर्वत्र मरणघाईचं बीज सोडत. भय, ज्याचा चेहरा दुरुस्तीपलीकडं गेलाय, माझ्या चेहऱ्यात उतरतय

भय - माझ्या डोळ्यात नजर ॲडजस्ट करतय
भय - माझ्या पायात माझी उंची कमी करतय
भय - माझ्या काळजात विटीदांडू खेळतय
भय - माझ्या मेंदूत पश्चातापाचा पिसारा फुलवतय
भय - माझ्या लिंगात शुष्क शुष्क होतंय

भय उठतय बसतय उठतय बसतय एका ढगात
भय मला मेलेल्या माणसासारखं सभ्य करतय
बहुधा
मी.........

◆◆◆

## डॉन

डॉन
ह्या युगाचा सर्वोत्तम चतुष्पादू
त्याच्यासारखा तोच
स्वतःच्या अस्तित्वाचा नेमका अर्थ
ठाऊक असलेला

त्याच्यासारखे रक्त त्याचेच
दोन पाय लपवणारे
दोन पाय झाकणारे
दाखवायचे पाय वेगळे
लपवायचे पाय वेगळे

चालण्याला इच्छाशक्तीचा असा ताल
की ह्याची वाटचाल चांदी
बाकी सब कंगाल

डॉन
ह्या काळाचा गुणधर्म
ब्लॅक मनी ब्लॅक होल ब्लॅक माईंड

सुरवात माहीत नाही
पण शेवट
निदान काही गोष्टींचा माहीत आहे असा

डूखपुरुष
सर्पमित्र

माझ्या तळहातावर
माझी त्वचा फाडत
•••

## जंगल

आयुष्यभर लिहित राहिलो
एनकाऊंटरविषयी, खोट्या नोटाविषयी, किडनॅपिंगविषयी
कापल्या गेलेल्या पन्टरविषयी

फक्त एकाबद्दल कधीच काही लिहिलं नाही
जो फडफडत राहिला कवितेपूर्वीच्या कोऱ्या कागदात
जो जोजवत राहिला काळीज
ज्याला मीच घातली होती गोळी

जो माझा मित्र होता
जो माझ्या सायकलवर बसायचा - डबलसीट

आता डरकाळतोय त्याच्या ओरिजनल आवाजात
जागोजाग
आणि मला सापडत नाही
त्याचं जंगल
झाडाशिवायही हिरवं होणारं

सायकल चालवताना दोन्ही बाजूंना हमखास उगवणारं

◆◆◆

## दोरा कुठंय ?

आयुष्याच्या जंगलात हरवलेली अस्तित्वाची सुई शोधत छप्पनवेळा जेलमध्ये जाऊन आलेली
एक बाई हिंडतीये हातावर पायावर फाटत चाललेली जखम दाखवत माझ्या आत

मला विचारतीये
दोरा कुठंय दोरा कुठंय

सर्वच शहरातून, गावातून, महानगरातून हाकलली गेलेली आपली कविता

कवींनी संपूर्ण आयुष्य कवटाळावं
कुठल्याही वादापुरते शब्द टिकवू नयेत

जिथे जन्मलो ते शहर तरी कुठे आपले होते ?
बाराबोड्याचे हात आणि रांडेच्या रांडेच्या म्हणणारे ओठ

आपण कायम सर्वधर्मवर्णजात वर्गभाषाबहिष्कृत

लोकांनी कळप केले
आपण कळपावर एकटे चालून गेलो

लोकांनी गावकुसात ठेवले
तर आपण लोकांना आपली मांडी दाखवली

हा हिरॉईझम की हा इनोसंस ?

हितसंबंधांचा कलकलाट
दरबारी थाटात प्रस्तुत झाला
पण आपण कुणाला मुजरा केला नाही

लोक म्हणाले मुजोर आहेस
आपण म्हणालो हा माझा जोर आहे

आयुष्यानं दिलेलं दुय्यम नागरिकत्व स्वीकारून
जो तो यशाच्या सिटीझनशिपमध्ये खुश
आणि आपला पासपोर्ट असा
की त्यावरला आपला पत्ताही
वाचणाऱ्याचे डोळे फोडणारा

हे आपलं बरंच
की चालताना आपल्यासोबत
आपले दोन्ही पायही येतात
संपूर्ण

लोकांची डोकीही एपिसोडमध्ये वाटली गेली असताना

म्हातारे म्हातारे काय शोधतेस ?
दोरा कुठंय ? दोरा कुठंय ?
कविते कविते काय शोधतेस ?
दोरा कुठाय ? दोरा कुठाय ?

•••

## सहावा राऊंड : इनजेल सेल्फफायटींग

### तुरुंग

प्रयेक क्षणी एका गुन्ह्यातून सरकतायत
ह्या आयुष्याच्या काळ्या सावल्या

प्रत्येक सिनेमात एक गुन्हा नेम धरून
प्रत्येक सीडीत एक बीज बेकायदेशीरपणाचं

रक्त खेळवतय पाणी
पाणी पाजतय रक्त
बोटं लिहितायत बलात्कार
पावलं वाजवतायत खूनी पाठलाग

जे खरेदी केलं जातय
त्यात आहे कायदा चुकवून पार केलेली सराईत नजर

कुणाच्या नावाने आहे घटना ?
कोण आहेत कायदेशीर नागरिक ?

प्रत्येकाच्या पाठीला पोट चिकटल्य आसक्तीचं
आणि भीती

ईश्वराचा गळा कधीच कटलाय कलिंगडासारखा
आणि त्याची जीभ बळकावून जो तो बोलतोय
स्वतःचा F. S. I.
पृथ्वीची निर्मळ जमीन आहे कुठं ?

जो तो भिंतीत कैद आहे
एकमेकाची नजर चुकवत
एकमेकावर नजर ठेवत

जे तुरुंगात आहेत ते नजरकैदेत आहेत
आणि जे बाहेर आहेत ते आहेत नजरेतून निसटलेले
नजर न लागलेले

•••

# धाड

धाड पडतीये
भीती भीतीनं जळतायत भात्यात
त्यांच्या मानगुटींना पोलिसांची शिट्टी पिरंगाळतीये

पक्या पळतोय बायकोच्या केसांकडे
तिच्यात लपून राहिलो तर दिसणार नाही
पोलिसांना म्हणे
आयला बाईचे केस इतके खोल्वर

जळक्या कांबळ लपेटून धावतोय
त्याची त्वचा पादतीये घामाचा वास
न केलेल्या कित्येक आंघोळी त्यात उजळतायत
कमळा ह्याला कशी झेलते कुणास ठाऊक

रम्या साईबाबात ठाम
सबका भगवान एक
भाई लोगोंका और पुलीसवालोंकाभी

मरताना सगळेच घाबरलेले आणि वफादार
मरताना सगळेच सारखे
एकमेकात वारत
एकमेकाला खांदा देत
एकमेकात

◆◆◆



Scanned with CamScanner

## कोर्टात

जगाखालचं जग ते आमचं जग म्हणे
अंडरवर्ल्ड
आम्ही समजत होतो जगावरचं मलई खाणारं जग ते आमचं जग-ओवरवर्ल्ड

गुन्हे
जे तुम्ही नैतिक सफाईने करता पण पकडले जात नाहीत
त्यांचे आम्ही साजरे करतो जाहीर उत्सव

गुन्हे
जे तुम्ही करू इच्छिता
पण जे करण्याचे गटस तुमच्यात नसतात
ते करण्याचे गटस दाखवतो सरेआम - आम्ही

जगी ज्याने मनातल्या मनात रेप केला नाही
जगी ज्याने मनातल्या मानात मर्डर केला नाही
जगी ज्याने मनातल्या मनात कुणाला टोपी घातली नाही
जगी ज्याने मनातल्या मनात चोरी केली नाही
असा सर्वसंत कोण आहे ?

खोटं तर सगळेच बोलतात
ट्राफिक तर सगळेच तोडतात
आम्ही ते थोडं लाऊड करतो गनच्या आवाजाने
एवढंच

प्रत्येकात एक क्रिमिनल आहेच जसा एक बुद्ध प्रत्येकात
आम्ही आहोत त्या क्रिमिनलची ओपन स्पेस
Endarkenment
क्रिमी लेअर

मिलॉर्ड
जेल ही आमच्यासाठी असलेली राखीव जागा नाही
जेल आहेत स्वतःतला क्रिमिनल स्वतःला दिसू नये
म्हणून नव्व्यान्नव टक्के लोकांनी केलेली आरसेबंदी

आमचा आश्रम - जेलाश्रम

मिलॉर्ड
तुम्हीही पहा आमच्या चेहऱ्यात वाकून तुमचा चेहरा
कदाचित तुमच्या मिश्या
आमच्यासारख्या हुबेहूब असतील

•••

## प्रवचनानंतर

"आपण काहीच नसतो
आणि आपणाला तिथून पळायचं असतं

आपण काहीच नाही आहोत
ते आपण काही आहोत

सगळा प्रवास ह्या दरम्यान
सगळे गुन्हे ह्या दरम्यान

प्रत्येक गुन्हा म्हणजे आपण काही आहोत
हे दाखवण्यासाठी केलेली कृती"

साला म्हणजे आयुष्य हाच गुन्हा रम्या

"फक्त नसा"
पण नसायचं कसं महाराज ?

की तुम्हीही प्रवचन देताना
पळून चाललाय
नसण्यापासून ?

'महाराज' ही आयडेंटिटीही बरी आहे
'गुन्हेगार' ह्या आयडेंटिटीपेक्षा

रम्या
जेलमधून सुटलो की प्रवचन देऊ
वाल्याचा वाल्मिकी फार डिमांडमध्ये आहे भैय्या

•••

# कैदी

## कैदी नंबर २३

दात ब्रशनं पेंट करताना आरसे फोडतो जेव्हा त्यात चेहऱ्याच्या जागी दिसतं काळं बदक पाऱ्यात पोहणारं ! डोळ्यात ढग घेऊन तांबडे रात्री झोपत नाही. बहुधा फक्त कूस बदलत राहतो आवाजाचं कंबरडं मोडत. हात कायम हिरवा जसं खांद्यात झाड असावं जे फक्त कायम रंग पाठवतं पानांचे ! ओठ भाषेनं मुसक्या बांधल्यासारखे घट्ट जाडजूड.

जेवणाच्या थाळीत तंबाखू मळतो. मूळचा निपाणीचा बीडी कामगार होता. बायकोवर मालकानं रेप केला कामावर असताना. मालकाला मारलं ! "बलात्कार. रडते 'भाऊ' " बायको आली की तक्रार "आता रडून काय उपेग ? झाला तवाच उडून गेला ! बलात्कार काय देहात थांबतो का श्रीधरभाऊ ? बायकांचं शहाणपण शिलापाशी आनून ठेवलं आपन मर्दानी."

ज्या स्तनातून दूध पिलं तिथं पुन्हा आयुष्य येऊन थांबावं तितकं निरागस हसू क्षणभर अश्रू गरम करत वास्तवात.

एक कुंकवाची उभट रेघ
एक छातीला भेग
रग जगायची तगायची
टिकवत

एक दुःखी इंद्रधनुष्य रडतय पिचलेल्या छातीत ढग जमिनीवर पडूनही फुटत नाहीयेत.

## कैदी नंबर १२

छद्म पाणी ! स्वतःचं दुकान फोडलं गेलं तेव्हा पहात राहिला रानटीपणाचा पाचोळा वाजवणारा पोलिसी बूट ! जे गेलं होतं लुटून ते आलंच नाही परत आणि ह्यानं फोडलं जगण्यासाठी दुसऱ्याचं दुकान.

"खूप गाढवं रंगीबिरंगी जाताना पाहिली आयुष्यात पण प्रत्येक रंग त्यांचाही जड ! डोळे संशयाचा बूट घालून फिरतात. आपल्यालाही कळतं माणसाविषयी इतका संशय बरा नव्हे

पण सगळं संशयास्पद वाटतं भाऊ ! तुमचं लगानचं काय झालं ? ज्यानं चोरलं तो ॲवार्ड घेत आणि तुम्ही इथं समोर शेवटी ह्या भिंतीवर काळोख लिहीत ! अंधार उबवत बसायचं आणि खाली उजेडाची प्रतिक्षा करणारी सही करायची डोळ्यांनी रूटीन.

आयुष्याच्या पाठशाळेत तुम्ही काय आम्ही काय सगळेच निरक्षर.

अंगठ्यात अडकून पडलेले अंगठेबहाद्दर"

**कैदी नंबर ३३**

"काही गुन्हे लेफ्टी व काही गुन्हे राईटी मध्ये थांबणारा थेट बुद्धच.

आपण फक्त हात उघडणारे ! छत्रीदार मुठीत कधी गाणं कधी रडणं.

"कदाचित" हा एक शब्दसुद्धा पुरुन उरतो, आयुष्याला ! एक पोट्टा पाठवलाय वकीलाकडं ! पाहूया न्याय कशी ॲक्टींग करतो न्यायाल्यात ? जिभेच्या ताकदीवर निर्दोषपणाचा बकून.

एक सूर्य डोक्यावर थयथय नाचतोय
केस उडत चाल्लेत संयमाचे

टक्कल न पडण्यासाठी काय करावे भाऊ ?"

•••

## फाशीवर चाललेल्यास

जे झालं ते योग्यच झालं
जे होतय ते योग्यच होतंय
जे होईल ते योग्यच होईल

काय घेऊन आला होतास जे ठेवून जाशील
जे ठेवलं जाईल ते कुठं घेऊन आला होतास

जन्मलास तेव्हा आईच्या पोटात कैद होतास
वाढलास तेव्हा घराच्या भिंतीत कैद होतास
मोठा झालास तेव्हा समाजाच्या जेलमध्ये कैद होतास

तू थोडे मांस होतास जे पक्ष्यापासून बनले होते
तू थोडा मेंदू होतास जो माश्यापासून बनला होता
तू थोडं काळीज होतास जे बेडकापासून बनले होते
तू थोडा दात होतास जे मगरीपासून बनले होते
तू थोडा पाय होतास जे माकडापासून बनले होते

ही हवा तुझ्या बापाची नव्हती
ही आग तुझ्या आईची नव्हती

सकाळ झाली ती सूर्याची होती
रात्र झाली ती चंद्राची होती

तुझं असं काय होतं ?
हे रोलॅक्स घड्याळ ?
आपट आणि फोड

की फासावरही शेवटच्या क्षणी टाईम बघायचाय ?

•••



Scanned with CamScanner

## एनकाऊंटर

१

पोलीस त्यांना हिरव्या जंगलात घेऊन गेले तेव्हा पहाट नुकतीच फायर झाली होती सूर्यातून आणि झाडं भिंतीसारखी दगडी डोळ्यांनी तिला पहात उभाळत होती गर्द खडीदार उन्हं.

सहा माणसे
धंद्यानं खूनी
एक विशीचा
दोन तिशीचे
दोन चाळिशीचे
आणि एक साठीत - ह्या धंद्यातला लेटकमर

त्यांनाही माहीत होतं
त्यांना कशासाठी आणल्य ते

२

पोलीस म्हणाले
पळा
पण ते पळाले नाहीत

त्यांना पळण्याचा अर्थ मा ित होता

पोलीस मग बडबडत राहिले

कामाठीपुरातील वेश्यांवर, डान्स बारवर, रत्नागिरीतल्या असाईनमेंटवर, नवटाकवर, बायकोच्या त्रासावर

आणि वाट पहात राहिले
ते कधी पळतात ह्याची

शेवटी भाषा संपली
तेव्हा इन्स्पेक्टर म्हणाला
"रांडेच्यानो, आता तरी पळा"

पण ते पळाले नाहीत
त्यांना पळण्याचा अर्थ माहीत होता

रात्र झाली
तरी कुणाचाच संयम संपेना

मग पोलीस
मस्त खायाला लागले प्यायला लागले
तशी
जे पळाले नव्हते त्यांची भूक जागी झाली

इंद्रियांचा उठाव गजबजला
जीभ सापासारखी तोंड बाहेर काढायला लागली
जो इन्स्पेक्टर होता त्याने
त्यांना दिसेल अशा अंतरावर ठेवली
एक वाईनची बॉटल
आणि पोटभर पुरेल एवढे शेंगदाणे आणि वेफर्स

"जो पळेल त्याचा चकना आणि बॉटल"

पोलीस गप्पा मारत राहिले
चवींच्यावर, भुकांच्यावर, तहानेवर, दारूच्या वासावर

जो विशीत होता त्याचा संयम संपला
आणि जो साठीत होता त्याच्या हे लक्ष्यात आलं

दोघेही एकाचवेळी उठले
एक खायाला दुसरा त्याला थांबवायला
आणि दोघेही पळता पळता मारले गेले

बाकी चार होते ते पळाले नाहीत
त्यांना पळण्याचा अर्थ माहीत होता

दुसऱ्या दिवशी
पोलीसही गोंधळले
जे पळत नाहीत त्यांचं काय करायचं ? ह्या प्रश्नात

वरून ऑर्डर येत नव्हती
आणि जुनी ऑर्डर तर कडक होती
''पळतानाच एनकाऊंटर करण्याची''

शेवटी इन्स्पेक्टरचा संयम संपला
तर साहेब म्हणाला

''इलेक्शनका टाईम ! कलसे फर्मान जारी है
कोई कुछभी बोल नही रहा है
तो मैं क्या करू ?
चार लौंडोको दौडा नही सकती पोलीस
तो उसको क्या गांडमे डालना है ?''

◆◆◆

## फाशीवर चढण्यापूर्वी

यदाकदाचित नरक असेल तर फादर त्या आगीत जळायची माझी तयारी आहे. जर त्या क्रूसावर सूळी चढायचं असेल तर मी माझे हातपाय नरकाधिकाऱ्यांना स्वखुशीने बांधून देईन. माझ्या काळजात घुसू देईन हजार खिळे आणि मला नसीब होवोत हलाहल पाजणारे हजारो हात.

मी खात्रीनं सांगतो माझा नरकवासही मी उत्सव म्हणून साजरा करेन त्या आकांतिक यातनात.

ईश्वर खरोखरच आहे
ह्याहून आनंददायक काय असेल फादर ?

◆◆◆

## सातवा राउंड : कन्फेशनल गन

### पश्चाताप : १

गुन्हेगारी केस
जो चकाकत होता पूर्वी आरश्यात
नाकात उगवलाय भाई

ना कुरळा ना सपाट - विचित्र उभट
स्मृतीचा बसलेला आवाज आता ठणकतोय कानात

ही रात्र एकाएकी झालीये सफेदपोश
काळ्या त्वचेपासून अलग होत

आयुष्य वाळवत बसलाय आठवणींचा हात
रिलॅक्स क्षणांच्या शोधात भरकटलेलं रोलॅक्स
थोडं अनईझी झालंय भाई
अतिशय कष्टानं दाबून ठेवलेलं सुशिक्षितपण
आता काळजात दुखतय

रंग उडत चाललेत मेंदूचे, रक्ताचे, त्वचांचे
सगळं ब्लॅक आणि व्हाईट दिसू लागेल
अशी भीती वाटतीये

चंद्रासमोरून गेलो तर अमावस्या होईल
इतका काळोख उरात
अतृप्तीच्या रस्त्यावरून

मरणापूर्वीची तिची किंचाळी
दात घासत येतीये टूथब्रशवर

टूथब्रश
जो मरतानाही तिनं गच्च पकडून ठेवला होता
वाढतच चाललाय
केसाकेसाने

♦♦♦

## पश्चाताप : २

काय वाटतंय ते कळत नाहीये
मर्डर परफेक्टपणे केला ह्याचं समाधान
की जीव हातोहात संपवला ह्याचं दुःख
सुपारी आपल्यापुढं आणि देवापुढंही
तसा कुठलाही मर्डर देवाचा खून करूनच सुरू होतो म्हणा

काय जळतंय ते उमगत नाहीये
आतला अंधार बाहेरच्या काळोखासारखा नाहीये
आतली रात्र बाहेरच्या रात्रीसारखी नाहीये
तरीही बाहेरला चंद्र उजळतोय
आतला चंद्र जळतोय
बाकी सब पौर्णिमा बारा टक्के - तशी हीही

काय धाडस करतंय ते समजत नाहीये
चिंता वाघासारखी सरसावतीये
आणि अवघं शहर डरकाळ्या फोडून फाडून खाईल
अशी भीती वाटतीये
आपलं काळीज चिमणीएवढं
पण कसली कसली जंगलं दाखवतंय रक्ताच्या पॅटर्नमध्ये

आता थकून परतल्यावर
वाटतय की
ही संध्याकाळ फक्त पाखरांची असावी
जिला सूर्याची त्वचा शरीरात बांधून ठेवणार नाही
जी असेल मुक्त आणि स्वतंत्र

पण असं घडत नाहीये
पाणी चेहरा मागतय सकाळपासून
आणि चेहरा पाण्यासारखा वाहून चाललाय सर्वत्र

उरलाय तो क्रोध
जो जिभेकडून मागतोय आग
आगीकडून शब्द

वणवे टणाटणा उडतायत सूडाच्या तळहातावर
पांढऱ्या केसांचा पश्चाताप
राख होतोय जळलेल्या नशीबाच्या राखेत

एका हातावर झोपताना नासतोय दुसरा हात
एक डोळा मिटताना दुसरा डोळा

झोप झोपणाऱ्याचाच वध करत चाललीये
आणि मुळे स्वतःला शोधत फाडतायत
आख्खी पृथ्वी

पृथ्वी फाटत जाताना आपल्यातच होणारा असह्य आवाज
आणि तो अंगाला लागू न देणारी आपली निब्बर कातडी
ह्या धंद्यातली रात्रकमाई

आता ह्या क्षणी तिची लाज वाटतीये भाई

◆◆◆

## चाहूल

आजकाल हाडं ऐकू यायला लागलेत
त्वचा जी कानात कापूस घालून असायची
आता सगळे बोळे पचवून
त्यांना एन्टरटेन करतीये
तिचं मांसल पांघरूण फाटत चाललंय
तणावग्रस्त जागी

एखाद्या स्मृतिचिन्हासारखं थांबून गेलंय आयुष्य
रक्त आणि अश्रू ह्यांच्यातला कळत नाहीये फरक
स्वर्ग एक्सपायर होतायत पन्नास रुपयाच्या टॉक टाईमसारखे
नरक लाईफ लॉंग स्कीमची गॅरंटी द्यायला लागलेत

सत्यनारायण, साईबाबा, वैष्णवदेवी, बालाजी
प्रत्येक बोट पकडूनही ही कोरडी वेळ ओली होत नाहीये
भाई वाळूचा महापुरुष असल्यासारखा सामोरा येतोय
जो तो बोलतोय गँगमधल्या जुन्या लोकांची
खतऱ्यात असलेली पोझीशीन
रेबॅन लागला की सुपारी घेणाराही इंग्लीशमध्ये
बोलायला लागतो आजकाल

भेटणाऱ्यांचे हात संशयास्पद वाटतायत
आणि ज्यांचे फोन येत नाहीत
ते आपला मर्डर तर प्लान करत नाहीत ना
अशी शंका येत राहते

आयुष्याचा सरफेस उडत चाललाय घिसून घिसून
एखादा टिनपॉट छोकराही होतोय मथ्थडताप
डोळ्यांचे रंग जमा होतायत रक्तात
नखं पांढरी पडत दाखवतायत संपत चाललेली
टिकण्याची खात्री

आपल्याच संशयाचा अजगर आपल्याला गिळतोय दिवसरात्र
आणि आपलीच हाडं आतबाहेर पीचत चाललेली
आपणच कल्पना केलेल्या काल्पनिक मृत्यूत

•••

## जीभ

भाईनं सांगितलं संपूर्ण गळ्यातून चिर तर मारताना दया आली. बाईमाणूस ! केवळ आपल्या विरूद्ध साक्ष देते म्हणून ठार कशी मारणार ?

मध्यम मार्ग म्हणून जीभ कापली आणि ठेवून दिली भाईसमोर तर भाईनं आपल्याच कानाखाली काढून तिला मारायला आणखी चार माणसं पाठवली.

दोन दिवस शोधली पण बाई सापडली नाही. तिसऱ्या दिवशी गटारी अमावस्या म्हणून नवटाक पिली तर आपलीच जीभ वितळून थेट पोटात. काही बोलता येईना म्हणून कळवळलो तर स्वतःच्याच तोंडात एक नवीन तयार झालेली जीभ ! ती तोंडातून काढून पाहिली तर हुबेहूब त्या बाईच्या जीभेसारखी ! किंचाळून ती फेकायला गेलो तर ती उडणाऱ्या सापासारखी सुळ्ळकन थेट आपल्या तोंडात. तंतोतंत फीट ! मुकं राहण्यापेक्षा बोललेलं बरं म्हणून आपणही ती चालवून घेतली.

आणि बोलत राहिलो रात्रभर
रात्री थकून लवंडलो तर रात्रभर

आपल्या तोंडात जीभ जागी ! स्वतःशीच पुटपुटत !

ती काय पुटपुटते ते कळेना
आणि झोप काही येईना

सकाळी शेवटी कंटाळून आरश्यासमोर उभा राहिलो तर आरश्यात ती बाई बाम धरून उभी.

तिच्या डोक्याला आपले दोन कान
आणि तिच्याही डोळ्यातून आपल्याप्रमाणेच
झोप उडून गेलेली

•••

## पश्चाताप ३

ओल्याबरोबर सुकं जळल्याची विषण्ण बोच
ह्या धंद्यात इनोसंट चेहरे रात्रभर काळीज फाडत राहतात

आम्ही हॉल्ट घेतलाय शिर्डीच्या सीडीत
फॉल्ट बुडावा म्हणून
हात जुळतोय तिरळ्या श्रद्धेत
घोड्याचा चकणा डोळा चमकतोय अप्रसन्नतेत

गाड्या पार्क भक्तीच्या पार्कमध्ये
लगेज झाडांमधून सरपास करत रिसेप्शन काउंटरकडे
श्वास भरतायत फाईवस्टार गार्डन टूटायर फुफ्फुसात
दिल गार्डन गार्डन हो गया
पक्या बकतोय
आणि बकताना दिल बर्डन बर्डन

चंद्राच्या पूनवचेंडूने आम्ही खेळतोय
काळोखाशी क्रिकेट
पाटा विकेट आमच्यासाठी कधीच नव्हती
आमच्यासाठी होती माती आणि गवतही कुरतडून खाणारे तीक्ष्ण पांढरे उंदीर
भजनं चालूहेत
आणि आमचा प्रत्येकक्षणी उडतोय जमीनदोस्त त्रिफळा

"कहाँ जा रहे है हम ?"

मूल मारलं गेलेलं रडतय रातकिड्यातून
साईबाबाच्या सुगंधातही हात वाळत नाहीये
बोटं रक्तानं ओली
आणि तळहात खोली गमावून सपाट

प्रत्येक चॅनेलवर मुलाचा तोच इनोसंट आवाज
हातातला रिमोट हवालदिल
काळा पडत चालल्लाय प्रत्येकाचा सोकॉल्ड कलर चेहरा

आम्ही आडमाप जेवतोय जेवतोय जेवतोय
जणू अन्नाखाली प्रत्येकाला ते मूल पुरायचय

प्रत्येकजण देतोय आडदांड टीप
हात मोकळे
बिलिंग पुण्यात

◆◆◆

# गुन्हा

तो सुरू झाला तेव्हा अत्यंत निरागस दिसत होता. वाटलं की हा गुन्हा नाही फक्त कायद्याची केलेली काही क्षणांपुरती चेष्टा आहे. किंवा न्यायाची उडवलेली काही सेकंदासाठीची रेवडी. हाताच्या स्पर्शानिही शरीर फुटणारय हे कुठं होतं कळलं सुरू होताना ? कुटुंबापासून टांगा टाकत दूर जाताना कुठं माहीत होतं की ही नानाची टांग आपला मामा करणारय ?

जगणं अटळ आणि अपरिहार्य असतं हे तर शेंबूड पूसता येत नव्हतं त्या वयातही श्वासांना कळलं होतं नाकातल्या नाकात. पण नकटीच्या लग्नाला सतराशे साठ विघ्नं आली आणि नाकासमोरचं काहीच सरळं नाहीये असा भास व्हायला लागला.

मग एका दुबळ्या क्षणी निघालो आपण

आयुष्याचा मध्य सोडून परिघाच्या काळोख बोळात. प्रत्येक घोटागणिक शक्तिमान होत व्हिटॅमीन मनी चघळत कोसळत राहिलो चाळीत, तळघरात, हॉटेलात ! कुणीतरी डोक्यावर पाय ठेवल्यासारखं ! बळीसारखं ! थेट पाताळात ! पाताळयंत्री भूमीगत भूमीसातत्य!

आता दोन्ही हात एकमेकांपासून स्वतंत्र आहेत हीच आपल्या मानवी स्वातंत्र्याची व्याख्या.

आणि पोलीस मागे लागले

की दोन्ही पाय गांडीला लावून यशस्वीपणे पळता येते ज्यादिवशी

तोच दिवस आपला पंधरा ऑगस्ट

•••

## आई

कित्येक अश्रू वाळवले
कित्येक दुःखांची षटके गोठवून ठेवली एका नोबॉलमध्ये
आमच्या बंडाच्या हिटविकेटस पडल्या
व्यवस्थेच्या सर्वत्र खणून ठेवलेल्या मैदानावर
मुठींची झाली राख
आणि फटके फाडत राहिले भाडोत्री फाईटसची पावती

ज्या हातांनी शाळेत झाडं लावली
तेच हात मार्केटमध्ये सेलला लागलेले पाहिले
अश्रूवर जमा झाली फक्त श्रीमंतानाच परवडणारी प्राईस टॅग

बदनामीचं बायबल रचलं गेलं चॅनेल्सकडून
प्रसिद्धीच्या हवेत होतं अनोळखी होत जाण्याचं विष
कुठं होतो आणि कुठं पोहचलो

झोपसुद्धा दचकत दचकत घेतली
आणि जाग आली तेव्हा
प्रथम जिवंत असल्याची खात्री करून घ्यावी लागली

जखमी झालेल्या बोटांनी वाजवले रिकामे ड्रम
रक्त गाळत जाणाऱ्या हृदयाने गायले माफिया प्रेम

तू माफ करावंस म्हणून
तुझ्याच दारावर मारल्या थापा
तर त्याही तुला वाटल्या थापा

आईचाच विश्वास उडून जाणे
ह्यापेक्षा कठोर नसते कुठलीच शिक्षा

आयुष्याबद्दलचा हा अविश्वास तुझ्या गर्भाशयात तर नव्हता
नफरतीची ही प्रवाहपतितता तुझ्या दुधात तर नव्हती
तू तर कधीच म्हणाली नाहीस
इतका पैसा मला हवा

मग का ही मोबाईलची चळदार थेरं सुचली ?
का चढला कैफ टेलिव्हीजन कलरफुलच घेण्याचा ?

तुझ्या मायेचं साधं पातळं
का विरविरीत केलं आम्ही आमच्या ह्या डावांनी ?
हा धगधगणारा असंतोष कुठल्या क्षणी आयतोबा झाला
ह्या अस्तित्वाच्या भूतबंगल्यात ?

कळून सवरून का पत्करला क्राईम
आणि चालत राहिलो ही वाळवंटांची छत्तीस दुर्गुणी वाट ?
काय शोधत राहिलो चेहऱ्याला डांबर फासून
ह्या चोवीस तास फुटणाऱ्या आरश्यात ?

आई
तुझ्या हातातल्या समुद्राचं प्रामाणिकपणाचं मीठ
हे असं चुरगळत चुरगळत राहतं प्रत्येक जखम
आणि रडायला खांदा शोधतो तेव्हा
तुझ्या न उघडणाऱ्या दरवाजापाशी
गळून पडतात
कूजत चाललेले अश्रूभरले डोळे

•••

# आठवा राउंड : बिझनेस गन

## धंद्यात काही राम राहिला नाही : १ :

धंद्यात काही राम राहिला नाही

प्रत्येक रांडपुनवेनं चाँद आणून बसवले धंदेवाईक खिडकीत ! नाईलाजाच्या संभोगासक्तीनं कातडीचा केला चंदेरी पैका मुंबई नगरी बाँका करत. कामाठीपुरातनं आपण मारली ह्या शहराची मध्यमवर्गीय गांड.

अधोविश्वाचे ढुंगण खुले ठेवले दोन भोकांनी !

तोंडात घेतला प्रत्येक लंड
जात पात न पाहता

आता प्रत्येकाचा अपना सपना मनी मनी

स्वखुशी वाढत चाललीये सक्तीपेक्षा
पोरी साईटवरच उपलब्ध
पळवून आणायची चीज
स्वतःच बाजारात अवेलेबल

आख्खी दुनिया कामाठीपुरा ह्या ग्लोबल युगात भडवेसुद्धा कानाला मोबाईल आणि हातात लॅपटॉप घेऊन उभे.

आता शिल असलेल्या पोरी कशा स्मगल करायच्या भाई आणि का ?

•••

## धंद्यात काही राम राहिला नाही : २ :

धंद्यात काही राम राहिला नाही

नवटाक झालीये झोपडपट्टी पुरतीची भाषा
जी मरायला टेकलीये
बाजारात सुपरफाईन वाईनचे किंगफिशर
ऑफिशियल अड्डे घेऊन
आपली पोरंही हात लावत नाहीत आजकाल देशी दारूला

ह्या देशात कुणी महात्मा गांधी झाला होता
ह्यावर कोण विश्वास ठेवेल भाई ?
आपल्या धंद्याचा आधार बापू होते
हे आपणाला तरी धंदा करताना कुठं माहित होतं !

दारू खुली झाली
पिणाऱ्यांची तोंडे वाढली
पण आपले गळे मस्काकट कापले गेले

आता रक्ताला सोसत नाही नवटाक वास
हृदयालाही लागतो आधुनिक द्राक्षसम्राट

अधूनमधून मोहाची दारू फॅशन म्हणून
पण फॅशननं कधी चोवीस तास पोट भरतं का भाई ?

•••

## धंद्यात काही राम राहिला नाही : ३ :

धंद्यात काही राम राहिला नाही

आता आपणच बिल्डर व्हावं भाई
रहेजा, अंबानी, टाटा सगळे कन्स्ट्रक्शन लाईनीत
ह्यांना कुठल्या फोनवरून धमकावणार भाई
फोन पण ह्यांचेच
टॅप झालो की थेट टापाच आपल्या छातीत

अंडरवर्ल्ड म्हटले की फिदीफिदी हसतात ह्यांचे दात
आपली दगडी चाळ ह्यांच्या मॉलपुढं कुठं टिकणार भाई ?

हे तासातासाला रूट कॅनाल करणारे लोक
आपली दुनिया कवळीसारखी थरथरायला लागलीये भाई

अपनीभी दुनिया इनकी मुट्ठीमे
चिंटीकी आंटी आंटीकी चिंटी

◆◆◆

## धंद्यात काही राम नाही राहिला नाही भाई : ४ :

धंद्यात काही राम राहिला नाही भाई

शूटर्स संपत चाललेत मुंग्यांच्या पावलांनी
पोलिसांनी मांडलाय प्रोटेक्शनचा धंदा
पोलीस फंडाला पैसे देऊन जो तो मिळवतोय
ऑफिशियल सिक्युरिटी गार्ड

सुपारी घेणारे हात स्वतःच अडकित्यात अडकून
दहाही बोटे अडकून सिताराम

आता सुपारी कातून पानात ठेवा भाई
गळा कटण्याआधी विडा रंगलेला बरा

•••

## धंद्यात काही राम राहिला नाही : ५ :

धंद्यात काही राम राहिला नाही

ह्या गोल्डन हातांनी कित्येक जहाजांच्या रमी उतरवल्या
कित्येक मंगळसूत्रं आपल्या स्मगलिंगनं सजली-सात फेऱ्यात आठवा फेरा आपला
सोन्याचा भाव
त्याची आकाशापर्यंत धाव
फरकात जगत राहिले आपले दरगामी श्वास

कित्येक इलेक्ट्रानिक्स आयटम नाचवले आपण
समाजवादी डान्सबारमध्ये
कित्येक मनीष मार्केटस ईशमनी केली विशमनी केली
कस्टमी हेराफेरीत

आता आख्खी मुळं खुली इंडियन फिंगर्ससाठी
ही डुबत जाणारी आपली जहाजं
उदारीकरणाच्या जागतिक समुन्दरात

दबक्या पावलांनी नष्ट केल्या आपल्या चोरवाटा
आणि आपण घेत राहिलो
नरम पावलांची चरम चरणसर्विस

आता चोरून आणायचं तरी काय
आणि पाठवायचं तरी काय

भिंती उडून चालल्येत
आणि भिंतींना खेटून असणारी आपली पाठ
भुगा होतीये

एकदा हे हशीश, गर्द वगैरे नशेमन खुलं झालं
की मेलाच आपला पोपट

हा मनाईचा पिंजरा पिंजरा नाही भाई
तो आपल्या धंद्याचा प्राण आहे

जोवर तो तोवर पोपट
आणि ही पोपटपंची

•••

# नववा राऊंड : ग्लोबल मशिनगन

## दंगल

दंगल ऑर्गनाईज करून आम्ही प्रेतांच्या ढिगावर बसलोय उदासपणे
थरथरणाऱ्या प्रश्नाचा लाल गुटखा तोंडात गुटखत
ट्यूबा आणि फ्लडलाईटस विझू विझू प्रकाशवतायत काळजातला काळोख एकांत
कुणाची मान ताणली गेलीये बगळ्यासारखी
कुणाच्या जिभेतला कोल्हापुरी रस्सा मचूळ होऊन गेलाय
कुणाचं तोंड उघडं पडलय लयास गेलेली अक्कलदाढ शोधत
कोण स्वतःच्याच मुठी आपटत गातोय आवारा गाणं
"छलिया मेरा नाम छलना मेरा काम"

हातातले घोडे वापरावेच लागले नाही
इतक्या दुबळ्या होत्या माणसांच्या छात्या
भाई ऑर्डर देताना म्हणालाच होता
"धर्म म्हणजे पेट्रोल आपण काडी टाकली
की दंगलीची गाडी धावलीच शंभर प्रेतं पर अवर स्पीडनं"

"कॉन्ट्रॅक्ट किलिंग रिलिजियस फीलिंग पॉलिटिकल डीलिंग
आपलं बिलिंग फाटलं की जय जय मनी"

तरी मग का उदास वाटतय हे मेलेले लोक पाहताना

"ये तो मौतकी भीड रचा दी हमने
मौत अकेली आई तो बोझ नही बनती
तादादमें आती हैं तो गुनाह लगती है"

"जो हुआ गलत हुआ
एक मशीद क्या गिरी सबका टाका ढीला हुआ

कोई गेरुआ कोई हरा कोई पीला कोई निला हुआ
यही कलर टिव्ही है भैय्या
तो इसको गांडमे डाल भैय्या
काहेकी व्हरायटी
अपनी सोसायटी बँटी है बँटी
और अन्दरसे सबकी फटी है फटी''

आम्ही फाटत फाटत चाललोय सुनसान रस्त्यावरून
आणि कुणालाच सापडत नाहीये ईश्वरी सुई

◆◆◆

## ग्लोबलायझेशन

मरणाची शिक्षा झालेला एक पाताळयंत्री देव घोड्यावर बसून अवतरला
जन्म देणाऱ्या बाईच्या छत्तीस अवगुणी गर्भाशयात
सैतानाने कान दिले इब्लिसने मेंदू माराने हात
मांसाच्या मेणात जळाला चंद्राचा अमावसी चेहरा

माणूस फाडून खाणारी नखे वाढवत लिहलं गेलं भाईदार नशीब
प्राचीन नाण्यांचा भुगा करून तो पिळला गेला डोळ्यात
नाकात नांगर टाकला श्वासांनी कायदा पोखरून पोखरून

निर्दयता, अचूकता, अशांती
तेथे भाईची वस्ती

हृदयाच्या जागी स्थापन झालेलं इलेक्ट्रॉनिक घड्याळ
अद्ययावत रक्तानं बोलत राहिलं क्राईमची युनिवर्सल भाषा
आख्खं जग कोल्हापुरी पायताणागत चढवत
पाय चालत राहिले नकाशावर मोबाईल पावलांनी

बघता बघता कंपनी ग्लोबल झाली
आणि केस उडून उडून
भाईचं डोकं झालं
सपाट पृथ्वी

विश्वाचा आकार केवढा
भाईच्या डोक्याएवढा
केवडा रे केवडा

•••

## धग

मेकअपमध्ये सुरकुतीही उन्हाच्या किरणासारखी तळपतीये. वादळं ओठावर उमलण्याची वाट पहातायत. भाषा अप्रोच झालेली नाही. कदाचित चुंबने न बोलताच चालायला लागतील. चेहरा बस स्टॉपसारखा लागतोय. सुटतोय. हे बरंच आहे की टर्मिनस भेटत नाहीये. क्षणात काही जिवंत होतंय काही रिवर्समध्ये जातंय.

स्वतःचं अस्तित्व स्वतःलाच सहन न होण्याचा हा दौर संपत चाललाय की सुरू झालाय ? कुठल्याही किंमतीवर वाळवंट तयार करू पाहतोय प्रत्येक वाळूकणाची नोंद ठेवणारा कम्प्युटर.

स्नॅपस साठतायत खजूराच्या झाडाखाली तिच्या अंगाच्या सावलीत. ती शस्त्रांना विरामचिन्हे शिकवतीये आणि फायटर्स केवळ तिच्या शब्दाखातर बदलतायत त्यांच्या आयुष्याचं मूलभूत व्याकरण.

हा भाषेचा कडेलोट आहे
आणि खाली आहे
आयुष्य वाया घालवणाऱ्या नशेची
बेबंद धग
गेस्टऑपिअरन्समध्ये

•••

## फेक

फेक पेन्टिंग्ज विकताना हात असावे लागतात सॉफिस्टिकेटेड ! जे फेक असतं त्यालाही एक इसेन्स असतो मॅनेज केलेल्या प्रत्येक तपशिलाचा ! रंगाना फार सन्माननीय रितीनं ओतावं लागतं मूळाबरहुकूम ! प्रत्येक आकाराची त्वचा ट्रान्सफॉर्म करताना तिला दिवा न्हावा तसं न्हावं लागतं मूळ प्रकाशातून.

मग बाजारात आणलं की विसरावं लागतं की ते फेक आहे.

फेक पेन्टिंग विकताना फेक सायकॉलाजी पुरत नाही.

पुरतो सेल्समनचा अस्सल ओरिजनल हात.

♦♦♦

## डॉन मेलाय

डॉन मेलाय आणि एक विश्व थांबलय. पृथ्वीला गेलाय एक पाताळयंत्री तडा आणि सगळं अचानक स्तब्धय ! तलवारीतली धारदार वादळं ! बंदुकीतल्या गोळ्यांची जहाजं ! डोक्यातल्या काळ्या विचारांचे ढग.

समोरचा डाव उधळला गेलाय आणि हवेत सगळ्या काळ्या सोंगट्या स्तब्ध.

काही क्षणात श्रद्धांजली वाहून सगळं चालू होईल. काळ्या सोंगट्या पुन्हा पांढऱ्या सोंगट्यांशी चेस खेळायला लागतील. जहाजं पुन्हा डोलायला लागतील. वादळं पुन्हा तजेलदार होतील आणि विचारांचे ढग पुन्हा पाडायला लागतील मृत्यूचा पाऊस.

काळ्या रंगातही काही अपरिहार्य नसतंच

◆◆◆

# एस्केपिस्ट

संशयास्पद हवेच्या संशयास्पद श्वासात
संशयास्पद बॉडीच्या संशयास्पद सर्च लाईटीत
भाई गोळा करतोय
संशयास्पद प्रकाश

पांढरे पडलेले केस
म्हातारपण टाचत उडतायत संशयास्पद झुळकीने
काळजाचा तबला वाजवतोय घोड्याचा एकताल
ह्याला उडव आणि त्याला झोडव
ह्याला धमकाव आणि त्याला पाव

दुनिया भाईकी रिलायन्सी मुठ्ठीमे
बॉर्डर्स उडत चालल्येत टेक्नोविंग्जनी
अनलिमिटेड ग्लोबल नेटवर्क ठसठसतय
हव्या त्या परवडेबल प्लानमध्ये

ढग आणि चिखल एकाच वेगाने उडतायत आसपास
पाठीचा मणका झालाय मोबाईल
आणि बालहट्टाला क्रॉस करून
नंबर वन बनतोय भाईहट्ट

जॉब आब राखत पार पाडला जातोय
दुबईत उघडून ठेवलेला मॉल
आणि खुद्द गेटनं घेतलेली भाईची भेट

गॉगलसुद्धा छाती फुगवत चाललाय आलिशान नरकातून
"गिल्ट" बिल्डिंग बांधतोय जिहादात
चार पाच ह्युमन बाँब स्पॉन्सर केले की दर्देदिल गायब
प्रत्येक कन्फेशनमागे पाच हजार दिनार

रक्ताचा ग्रंथ वितळतोय भाईच्या पापण्यांतून
थेट जमिनीवर
आणि दिसणाऱ्यांना दिसतीये ग्रीनरूममधून पसरत जाणारी पवित्र आयत

•••

## सरकारला हे कळवण्यास आनंद होतो की

सरकारला हे कळवण्यास आनंद होतो की अंडरवर्ल्डमध्ये सर्व काही ठाकठीक चालले आहे. प्रत्येकालाच प्रचंड पगार देण्यात येतो आहे आणि कुठेही कुणालाच आठवड्याला पंचवीस तासापेक्षा जास्त काम करण्यास सांगितले जात नाही. सर्वच बंदुकांचे, बॉंबस्‌चे, चाकूंचे भाव मर्यादित असून क्षमतेपेक्षा कुणालाही जास्त अंगमेहनत करायला सांगितली जात नाही. पोलिसांचे हप्ते स्टेबल असून सर्वच डॉन डिपार्टमेंटशी अदबीने वागतात. शक्यतो पोलिसांना गोळ्या घातल्या जात नाहीत आणि यदाकदाचित कुणी घातल्याच तर कोणी डॉन त्याला पोलिसांच्यापासून प्रोटेक्ट करत नाही. सुपाऱ्या सोशल स्टेटस् बघूनच चार्ज केल्या जातात आणि अर्डकित्ते कुवतीनुसारच आवळले वा दाबले ज़ातात.

काम करताना एखादा कामगार मेला तर त्याच्या कुटुंबियांना नुकसान भरपाई दिली जाते आणि कुणी पकडला गेला तर त्याचे घर शक्यतोवर व्यवस्थित चालवले जाते. पोलिसांचे व्यवस्थित टार्गेट पूर्ण व्हावे म्हणून सर्वतोपरी सहकार्य दिले जात असून डॉन गुन्हे घडताना कधीही उपस्थित रहात नाहीत.

देवावर शक्य तेवढा विश्वास ठेवला जात असून डॉनविषयी शक्य तेवढ्या अफवांचा प्रसार व्हावा म्हणून हिंदी फिल्म्सना पैसाही पुरवला जात आहे. देवही अधूनमधून भाई लोकांना हवे ते कौल देऊन चांगले को-ऑपरेट करत आहेत.

आठवड्यातून किमान एकदा सर्वांना सुट्टी दिली जात असून सुट्टीच्या दिवशी बार गर्ल किंवा बायको असा चॉईसही देण्यात येत आहे. सारेच कामगार आता मॉलमध्ये जाऊन खरेदी करत असतात आणि ते खरेदी करताना त्यांच्या काखेत क्रेडीट कार्डसचा कॅसियो वाजेल ह्याची काळजी घेण्यात आली आहे.

कळवण्यास आनंद होतो की
आकाशात देव आहे
जमिनीवर सरकार आहे
आणि दोघांच्या आशीर्वादाने
आमचा काळा पियानो
उत्तम रितीने ग्लोबल ढग वाजवतो आहे

•••

## भाई : २

भाई रोज एका नव्या उंदरात राहायचा आणि नाश्त्याला पोलिसांची बिळं कुरतडून खायाचा. प्रत्येक उंदराबाहेर होती मांजरपावलाची खिडकी आणि खिडकीखाली दहशतीची शतपावली. भाई कुणालाच दिसायचा नाही. दिसायचे फक्त उंदीर आणि खिडक्या.

खिडक्या कधी पिवळ्या व्हायच्या कधी हिरव्या. त्या लाल पडल्या की आम्ही समजायचो- मर्डर.

मुख्यमंत्री आले तेव्हा ते गुप्तहेरासारखे वाटले. भारतीय गुप्तहेर कधी जेम्स बॉंडसारखे दिसत नाहीत. ते आपल्या पुढाऱ्यासारखेच दिसतात. गोळ्या चालवतानाही आपली खादी फाटेल की काय ह्याचे भय ! गव्हर्नमेंटला गोळ्यांचे हिशेब देणे ह्यासारखं कठीण काही नाही.

मुख्यमंत्री आले तेव्हा AK - 47 गात होती कबूतरात बसून शांततेचं गाणं आणि आम्ही कोरस देत शांतता वाढवत होतो.

मुख्यमंत्री आले तेव्हा त्यांनी काहीच केलं नाही. फक्त शांततेचा कान पिरंगळला आणि भाई एकदम सूफाचाट - डिनॅस्टीका दी एन्ड - कान चाटत.

मेलेल्या भाईचा आम्हाला फक्त कानच दिसला.

•••

## तो

सातव्या हवाघरात जो होता
तो वेगळा होता
त्याला डॉन म्हणायचे नाही कुणी
स्मगलर म्हणायचे

तो छोटा राजन नव्हता
जो मध्येच कट्टर हिंदू होऊन
दाऊदच्या सिंहासनाची गांड फोडायचा

तो दाऊदही नव्हता
जो सरेआम पाकिस्तानमध्ये
दहशतीचा पाठ पढायचा
हिरव्यागार भिंतीत

तो छोटा शकीलही नव्हता
मोनिकाबरोबर ओ माय डार्लिंग करणारा

तो होता पंजाबी आबोहवा
भांगडणारा आणि सतत वाकणारा
रशियनांनी कैकदा पकडलं होतं त्याला
ह्युमन ट्राफिक करताना

एका बाजूला बर्फाळ विवर
दुसऱ्या बाजूला समुद्री नरक ठेवून तो वावरायचा विवरायचा
त्याच्या पांढऱ्या दाढीतून त्याची अक्कलदाढ
स्पष्ट दिसायची
आणि तो हसला की शार्कचा जबडा उघडायचा आपोआप

कुठलाच डॉन हात घालायचा नाही त्याच्या डोळ्यात

त्याच्या हाताला इन्टरनॅशनल क्राईमचं इन्टेरियर डेकोरेशन म्हणायचे
भाई लोक

तो होता क्राईमचं पहिलं ग्लोबलायझेशन
मजुरीचा ब्लॅक सुपर मॉल परदेशगमनात खडा करणारा

त्याला मी विचारायचो
सरदारजी, का पडलात ह्या धंद्यात
तर तो काहीच म्हणायचा नाही
फक्त गाणं गायचा
ना बाप बडा ना भैय्या
ना बिवी बडी ना मैय्या
द व्होल थिंग इज दॅट के भैय्या
सबसे बडा रुपैय्या

का कुणास ठाऊक
पण गाताना त्याचा आर्थिक सूर मायग्रेट व्हायचा
पंजाबमधल्या त्या खेड्यात
जिथं त्यानं पहिला खून केला होता
रशियात पळून येण्यापूर्वी

•••

## बिहारी

ते चोवीस वर्षाचे होते किंवा पंचवीस
जेव्हा बिहारहून तीन बिहारी आले
परदेशी डोळ्यांनी

उंच धीट बळकट
आम्ही बेकायदेशीर होतो
त्यांना कायदाच नव्हता

त्यांनी प्रथम सुपाऱ्या घेतल्या
बाजारभाव डाऊन करून
तेव्हा आम्ही म्हणालो
विदेसी चिडीया कितनी उडेगी

त्यांनी शटर्स उघडली तेव्हा
आत होती स्वस्तातली हत्यारं
जी बिनडोक्यांनी कुजबुजत राहिली
बिनकाळजाच्या कानात
रॅपिडेक्स मर्डर कोर्स

त्यांच्या लाईटी फूलपेज होत गेल्या तशी
केविल्वाणी दिसू लागली आमची कॉस्मॉपॉलिटीन थोटकं

काळ बिड्या शिल्गावणाऱ्यांचा आला
असं म्हणेतोवर
त्यांच्या हातात चमकायला लागल्या ५५५

आमच्या खिडकीबाहेरही गायाला लागली
त्यांची हत्यारं
आणि त्यांच्या डोळ्यासमोर
आमचा अंधारही फिका पडायला लागला

दहा वर्षातच
आसपास वाजायला लागली बिहारी शीळ
जिच्या तालावर
रेल्वेही डान्स करायला लागल्या डान्सबारमध्ये

सुरवातीला जे तीन आले
त्यातील एक बहरला दक्षिण आफ्रिकेच्या जीभकाप्या हवेत
दुसरा नेपाळमध्ये मस्काचस्का नशेत
तर तिसरा थेट पाकिस्तानात दाऊदचा हात मळत

त्यांची दहशत पसरतच गेली
थेट मलेशियापासून कोलंबियापर्यंत अगडबंब
आणि त्यांचा घोडा बोलत राहिला
मरेपर्यंत भोजपुरी भाषा

ते मेले तेव्हा पक्या त्यांची जीभ वाजवत श्रीधरभाऊंना म्हणाला
"श्रीधरभाऊ, ये लिखके लो
फ्युचर फिल्म इंडस्ट्री भोजपुरी है
जो लिखना है भोजपुरीमे लिखो"

◆◆◆

## मर्डर

बारबाला डान्स करता करता वाकतीये माझ्या उष्ण काळजात ! माझ्या दमट डोळ्यांना तिचे कोमट स्तन दिसतायत आणि माझ्या रक्ताचा लाल बो वाजवतोय तिच्या मांड्यातलं व्हायोलीन ! एक धैवत कोऱ्या रंगाचा उडतोय तिच्या ओठात ! एक नादीष्ट षडज तिच्यावर पडणाऱ्या सॅडीस्ट नोटात गर्जना करतोय फेक रागाची ज्याची बंदीश कोसळत चाललेल्या काव्याला कमर्शिअल सरड्याचा आधार देत रिमिक्सच्या मुंग्याना आकाशात उडवतीये एके फोर्टीसेवनच्या सेल्यूलाईड हेवनमध्ये.

आसपास फन्टर आहेत जे फायर फायर खेळत वायरी जोडताहेत गँगच्या

एक बॉडी मर्डर होऊन पडलीये खांदेकऱ्यांची वाट पहात आणि पोलिसांना फोन करण्याचं धैर्य शेट्टीला होत नाहीये. तिच्या त्वचेतून उसळतोय गरम घाम. निळी पडत चाललेली हिरवीगार नासाडी टिव्हीवरचा कमर्शिअल ब्रेक सोसत.

जे झालय त्यानं कुणीच खुश नाहीये.

जो मेलाय तो जुनाट सिलॅबसप्रमाणे काळ्या फरशीवर विखुरतोय.

जे जिवंत आहेत ते बाहेर पडतायत नव्या सिलॅबसप्रमाणे

न्यूजमधून निसटत.

◆◆◆

## जीम

ज्याला त्याला व्हायचय ऱ्हतिक रोशन किंवा सलमान खान. सगळे नवे पन्टर शरीर छाटून घेण्यासाठी जीमच्या कात्रीसमोर ! मास्टर हिंडतोय देवासारखा स्वतःचे दहा हात प्रमाणबद्ध हलवत ! त्याच्या हातात डंबेल्स आणि वेटस ! हवा हलत नाही डान्स करते ह्या हॉलमध्ये ! फरशी जमीनीपासून तुटल्याचं दुःख करत नाही तर पृथ्वीपेक्षा उंच झाल्याचा उत्सव साजरा करते गर्विष्ठ चकाचकपणात.

प्रत्येकजण व्यायामातून चालल्लाय उन्नत शरीराची उदात्त इज्जत करत आणि मास्टर प्रत्येक एक्जरसाईजचे सांगतोय छत्तीसगुणी सद्गुण.

एक ऑर्केस्ट्रा वाजतोय परस्परांना सहकार्य करत. परस्परांच्या शरीरात झॅप होत.

सगळं कसं चर्चसारखं पवित्र होत चालल्य आणि प्रत्येक पन्टर दिसतोय व्यायाम करताना कन्फेशनसारखा.

शब्द नाहीयेत

आसपास उमलताहेत बायबलचे कमर्शिअल आभास.

◆◆◆

## प्रेमकहाणी

एक भाई होता जो फिल्ममध्ये सात रंगात उमलला. एक नटी होती जी घोड्यात मधुर निरागसतेत खिंकाळली. तो होता रक्ताळलेला सुरवंट जो फुलपाखरू होणार ह्याची तिला होती फिल्मी गॅरंटी. ती होती फ्रेंच अत्तराची इंडियन जाहिरात जी आपली त्वचा गारद करून क्राईममध्ये सुवासिक नांदणार ह्याची त्याला होती रिॲलिस्टीक सुगंधित खात्री.

तिला रंग दिसायला लागले
त्याला अंग दिसायला लागले
पन्टर म्हणाले
रंगका भंग जमा दो चकाचक
फिरलो पान चबाए
ऐसा झटका अंगपे मारो
पुनरजन्म होई जाए

मग खाकी रंगात पोलिस आले. त्यांनी तिला ओलीस ठेवलं नजरेच्या अंगद ओलीसुकीत ! भाई भडकला पण त्याचा एक केसही रंगीत नाही झाला आणि तिला कळला त्याच्या केसांचा ब्लॅक ॲन्ड व्हाईट स्वभाव.

ती जगभर अश्रू ढाळत राहिली
आणि प्रत्येक पासपोर्ट ओला करत राहिली

शेवटी दोघे पकडले गेले तेव्हा तिचा गुन्हा होता फेक पासपोर्टवर जगभर वावरल्याचा. आणि त्याच्यावर आरोप होता फेक जगात मूळ माणसांना मर्डर करून नाहीसं केल्याचा.

पोलिसांना शेवटपर्यंत सापडला नाही
तिच्या फेक पासपोर्टसवर तिचा मूळ चेहरा
गवसली नाहीत अखेरपर्यंत
त्याच्या हातावर त्यानं खून करून नाहीशी केलेली
जगभरातली ओरिजनल माणसं

•••

# बर्ड फ्ल्यू

जे पोलिसांच्या गोळ्या खाऊन मेले ते झाले त्यांच्या अलौकिक क्रिमिनल शक्तीने बर्ड किंवा बदक. एक उडनशक्ती ज्याचा मागोवा घेण्यासाठी ते गुन्हेगार झाले हल्क्या हाताने पसरली त्यांच्या बदकभरल्या शरीरात आणि लोक म्हणाले बर्ड फ्ल्यू पसरतोय. एक माणूस ज्याला उडायचय तो का कोंबडी किंवा बदक बनतो ह्या युगात ? त्यांची शेपटी जी उत्क्रांतीत सोडून ते माणसाच्या शरीरात वावरले आता पुन्हा उगवतीये ह्या ट्रान्सफॉर्ममध्ये आणि ते उभे आहेत एका पायावर बर्ड फ्ल्यू पसरवत. त्यांची कॅककॅक तोंडं गातायत अंताक्षरी आणि ते कवींसारखी कवितेची अण्डी घालत उडतायत परड्यातल्या परड्यात.

बर्ड फ्ल्यू पसरतोय मांसाहारातून
आणि लोकांना कळत नाहीये इतकं चिकन खाऊनही
कोंबडी आधी की अण्डं आधी ?

◆◆◆

## अवाढव्यता

हत्ती आरश्यात वाकून पहात नाहीत. त्यांना अवाढव्यतेची खात्री पटवून घेण्यासाठी स्वतःचं प्रतिबिंब पहावं लागत नाही.

डॉन लोकांचं तसं नसतं. त्यांना गोविंदा लागतो, संजयदत्त लागतो, अल्का याज्ञिक लागते. ते बोलावतात त्यांना त्यांच्या आरश्यात वाकून पाहण्यासाठी.

अभिनेत्याचं तसं नसतं त्यांना आरसे लागतात, डॉन लागतात पण फिल्मस्पण लागतात स्वतःच्या अवाढव्यतेची खात्री पटण्यासाठी ! ते आरश्यात आंघोळ करतात. फिल्मी साबणाने अंग धुतात.

अंगाचं तसं नसतं. अंगाला आरसे लागतात, अभिनेते, फिल्मस् लागतात, डोळेही लागतात. अंग, डोळे उघडे ठेवून पाण्यात आंघोळ करतं. आरश्यानं अंग धुतं आणि कॉस्मेटिक्स चढवतं.

कॉस्मेटिक्सचं तसं नसतं. त्याला आरसे, फिल्मस्, डोळे, अभिनेते आणि पाणीही लागतं. कॉस्मेटिक्स प्रसिद्धीत आंघोळ करतं, जाहिरातींनी अंग धुतं आणि श्री पेज चढवत शोधत राहतं

पाण्यानं बनलेला हायफाय हत्ती
आरश्यापासून बनलेला टॉयटाय डॉन

•••

## वारसा

त्याचे वडील किंचाळतच राहिले दहा जिभांनी मेले तरी. स्मृतीत गुंडाळून ठेवलेलं शरीर कधीच जळालं नाही चितेत आणि आग हॉलमध्ये फडफडत राहिली त्यांच्या काऊबॉय गुन्ह्यांची.

त्याला डॉन व्हायचं नव्हतं पण मेलेला बाप पृथ्वीचा ड्रम वाजवत राहिला रात्रीच्या मृतप्राय झालेल्या शांततेत आणि त्याला शांत करण्यासाठी तो बोलत राहिला बापाची बोली.

एके दिवशी खोली नसलेल्या लांबी रुंदीत तो सपाट मेला तेव्हा पन्टर्सनी बांधला त्याच्या अस्तित्वाचा पुरावा आणि फोनवरून धमकावत राहिले, घबराहटी कानांना ज्यांना धमकीचा शिंतोडा पडला की साऊंड ॲटॅक यायचा.

तीन दिवसात इलाक्यात तीस करोडचा खंडणी टॉवर उभा राहिला. अस्तित्वाच्या पुराव्यातून बाग़ा चमकल्या, चंदेरी तलवारीत बंदुकांच्या गोळ्यातून गर्दाळू गुलाब फुलले.

तीन दिवसांनी तो चितेत स्वतःच जाऊन बसला तेव्हा आकाशात दिसली सर्वांना एक गोल्डन गन आणि तिच्यावर पन्टर्सनी आकाशात गोळ्या झाडून दिली त्याला दणकट सलामी.

कवटी फुटली तेव्हा लोकांना ऐकू आला कवटीतून बॉंबस्फोटाचा आवाज

आणि मग जी श्रद्धांजली पसरली तिच्यात जमा झाली अणुबॉंबची उथळ शांतता.

•••

## लाफ्टर

पन्टर्सनी लाफ्टर क्लब जॉईन केला तेव्हा त्यांना अंदाज घ्यायचा होता मेंबर्सकडून उकळता येऊ शकणाऱ्या खंडणीचा. ते हसू लागले सभ्य माणसांच्यात जाऊन जाऊन आणि त्यांच्या लक्ष्यात आलं की हसण्याने गुन्हा हलक्या काळजाचा होतो. भारनियमन होते अपराधी भावाचे.

पन्टर्स हसू लागले कॉमेडी करता करता आणि गुन्हे करतानाही दिसू लागले मिश्किल.

टॉर्चर क्लबचा टॉर्चही बत्तीस दात काढून जोक करता करता चावा घेऊ लागला.

आणि मारल्या गेलेल्या प्रत्येक माणसाच्या छातीवर दिसू लागला मरता मरता हसून हसून पुरेवाट झालेला रक्तबंबाळ दात

जो मरताना घश्यात जात होता
हसताना छातीतून उगवत होता

•••



Scanned with CamScanner

## सत्व

धुक्यातच उभा राहिला घनदट्ट मॉल ! अनावश्यक उपस्थितीचं शेवाळं विस्कटून नाहीसं करताना वापरलं गेलं आमच्या रक्तातलं पाणी ! जागा खाली करण्याच्या बदल्यात भाईला मिळाली हमेशा हमेशा पार्किंग झोनची इनकमींग वसुली ! बेसमेंटमधली ! आणि आऊट गोईंग गाडी ! शेपूट लावून चढत जाताना का कुणास ठाऊक पण मारुतीचा फील नाहीच आला ! फ्लेक्झिबिलिटी चिरडत गेली हाताचे मसल्स आणि उरलेल्या चुऱ्यानं बांधली व्हिम साबणाची हिरवी वडी.

कित्येक भांडी घासली आम्ही बारबार लगातार

कित्येक तोंडांचा टास्क कम्प्लीट केल्यावर
आमच्या चेहऱ्यावर उरला मास्क माज आणि लाज

आम्हालाही करिअर होतं रक्तानं लिहणारं
आणि जॉब होता सूर्य पिळून त्यातून उन्हाळा काढण्याचा

जागा फेविकॉल सारखी पिळली तेव्हा उभा राहिला मॉल
मुंडकी कोलगेटसारखी पिळली तेव्हा मिळाली पार्किंग

भाईनं पहिली पावती फाडली पहिल्या
कस्टमरची पार्किंगसाठी
तेव्हा तिच्या आवाजात थरथरत राहिलं आमचं तहानपिसाट काळीज

आणि क्षणभर आंबून नोटेत थांबून
कायमचं धुळीला मिळालं
आमचं कावेबाज सत्व

•••

# मुंबई

लहान बाहुल्याच्या हातात
एक प्लास्टिकची AK - 47
जगायला लागलीये एका फुलपाखराचं फिल्मी गाणं

फेक मोबाईलाला फुटतायत
लहानखुऱ्या संवादांचे झेरॉक्स ओठ

बनावट डोळे शूट करतायत
काळजातली आग

सूर्य एका टाचणीनं खिळून राह्यलाय
एका कोरड्या कोरडवाहू इंद्रजालात

मायाजालातले शिपाई परेड करत चालल्येत
रितीनिष्ठ जगाकडे
जिथून शेती दुरुन साजरी दिसते डोंगरासारखी

एक पाय वाजवतोय आदिवासी जंगल
एक पाय पाजळतोय  कॉस्मॉपॉलिटीन तलवार

एक फ्लेमिंगो चोचेची पीन लावून
साफ करतोय स्थलांतरात गुंतलेले सेलेबल पंख

मॉल उगवतायत भूछत्रासारखे
त्यांच्या भिंतीत सापडत नाहीये
चिऊताईला बांधकाम होताना बांधलेलं घरटं

फिक्शनल फ्लायओवर्सवरून सरकतीये
फोरव्हिलर मुंग्यांची खोळींबी रांग

आणि एक डॉन भांग पित बांग देतोय दहशतीची
जी ह्या महानगराच्या कानात मुततीये त्याची
अस्सल किडनी
डायलिसिसवरची

•••

## दोन डॉन

दोन डॉन ठाकलेत आमनेसामने
एकाजवळ मोबाईल्सची अनलिमिटेड व्हरायटी
तर दुसऱ्याकडे कान फाडत जाणाऱ्या
गोळ्यांची ग्लोबल रेंज

विजयाचा देव वाळवत बसलाय
युद्ध संपेपर्यंत टिकेल अशी विजयमाळा
तिची लाईफटाईम वॉरंटी संपलीये
१९८० सालीच
जेव्हा बाबू धारातीर्थी पडला एक खबरी मुंगी चावून

दगडी चाळीला बांधली गेलेली सडनडेथ त्वचा
बारकाव्याने न्याहाळतीये
मोबाईलच्या बॉडीवरला निळा तीळ

जेलमध्ये साफ करतोय टेक्नोक्रॅट हात
गोळ्या येऊ शकतील अशा साऱ्या दिशा

मोनोटोनस आवाजाचं दूध
उपसतय अवाढव्य संपत्तीची गाय
पौराणिक तबेल्यात

टक्कल पडलेलं शिक्षण
वाट पहातय M.B.A. च्या त्या केसांची
जे डोक्यावर उगवले की
डॉन राजबिंडा दिसणार होता

फुफ्फुसाचं जंगल तुडवून दमून गेलेत श्वास
पण नाकाची तलवार नाक घासायला तयार नाहीये
रक्तालाही चढायला आता अपुरी पडतीये वाईन
आणि काळीज तर मृत्यूखाली साईन करायला तयार नाहीये

मोबाईल गातायत कोरसमध्ये
पोरसचं सामूहिक गाणं
खरंतर कधीचेच गळून गेलेत पाय
आयुष्यात तावूनसुलाखून प्राप्त झालेला अविश्वास
ठाईठाई ठासून भरलाय

सगळंच सहनशीलतेच्या पल्याड गेलंय
विजयाचा देव विणत बसलाय कंटाळ्याचं स्वेटर
फायबरी धाग्यानं

सगळे आश्चर्यानं पाहतायत
विरत चाललेली दोस्ती
जी द्वंद्व खेळतानाही पाठीत सुरा खुपसायला तयार नव्हती

दोन गरुड फसत चाललेत
एकमेकांच्या गारुडात
एक ठिसूळ गळ्याचा कोकीळ गातोय
अविश्वासाच्या ठरावाचं गाणं

पांढरा पडत चाललाय चाळीचा प्रत्येक दगड
आणि जेलचा मजबूत दरवाजा मिनटामिनटाला निखळत चाललाय

एक ग्लोबल रेंज ठिकऱ्या ठिकऱ्या उडवतीये
मोबाईल्सच्या व्हरायटींची [redacted]
आणि एक मोबाईल दाबतोय तिची नजर चुकवून डेथ वॉरंट
जे टेक्निकली अत्यंत करेक्ट जागी इश्यु होतंय

◆◆◆

## मोनालिसा

ही बाई जी लेडीज डॉन आहे
गन उचलताना थेट मोनालिसासारखी हसतीये

तिच्या बोटांच्या काळ्या वायरी
एकमेकाला जोडल्या जातायत
आणि त्यात फाशी चालल्य माझ्या
तळहातावरचं गाफील नशीबाचं जंगल

तिच्या पाठीशी फडफडतीये तुकारामाची गाथा
फ्रेममध्ये लटकतोय
नवऱ्याचा धबधब्याशेजारचा आदर्श चेहरा

मी उभाच
तिच्या पन्टरनी पकडून आणल्यामुळं
तिच्या छत्रछायेत

माझा कवी असण्याचा माज
भाई लोकांपुढेही उतरत नाही
आणि ही तर नुकतीच धंद्यात आलेली बहन

तिच्या गळ्यातील मंगळसूत्राचा ढग
फॅनच्या हवेनं उडतोय
आणि त्या ढगाआडचा स्तनेरी चंद्र
तिच्या कलाकलानं वाढवतोय पोर्णिमा

तिला वाटतय की मी अरुण गवळीचा माणूस आहे
आणि थापाला कुणी मारलंय
हे मला एक्झॅक्ट माहीतय

वास्तविक ज्यांनी थापाला मारलं
त्यांची ताबडतोब चटणी केली ठाकूरांनी
आणि नाश्त्याला पाव खाताना
त्याला सूडपूर्तीचा मस्काही लावला

तिचं हृदय पेंडूलमसारखं हलतय
आणि हास्य रेग्युलेट करणारे ओठ - माझ्या ओठावर
भाषा उगवण्याची वाट पाहतायत

तिला कळत नाही कवींशी करसं बोलायचं त्यांना करसं बोलतं करायचं
तिच्या डोळ्यात झोपी जातायत स्वप्नांच्या गोगलगायी
आणि ती शब्दांच्या जळवा अंगाला लावून स्टॅमिनाचं
तारुण्य  टिकवण्याचा प्रयत्न करत मला प्रश्न विचारतीये

तिची प्रत्येक दादागिरी म्हातारी होत चालत्तीये
आणि कुठल्याही दादाप्रमाणे तिलाही तिच्या सुरकुत्या सहन होत नाहीयेत

ती बोलतीये बोलतीये बोलतीये
आणि मी शांतता ऐकत स्तब्धच

इतिहासात पारंगत असणारा एक मासा
मांडतोय माझी कहाणी
उसकी जुँबानी

तिचा हॉरर चित्रपटातला कान वितळतोय मेणासारखा
आणि गैरसमज दूर करणारी मेणबत्ती त्याच्यातून तयार होतीये

"श्रीधरभाऊ सॉरी थोडा मिसअन्डरस्टँडींग हुआ, काय घेणार चाय की कॉफी
की ठण्डा मँगाऊ ?"

तिच्या मांसाच्या गलेलठ्ठ लगद्याचा
बनतोय निलम

निळी प्रभा फाकत चालल्तीये रूमभर
असं वाटतय की
मोनालिसा कोणत्याही क्षणी बासरी वाजवेल
ह्या क्रिमिनल हवेत

•••

## डॉनस्

सुरवातीला डॉन समुद्रासारखे दिसायचे, जहाजासारखे डोलायचे, वादळासारखे हलायचे. त्यांच्या डोळ्यात नवटाक पिणारी रात्र असायची आणि लोकही त्यांना भरकटलेले मार्क्सवादी किंवा वाट चुकलेले क्रांतिकारी समजायचे.

नंतर सभ्य माणसांच्या लोकशाहीत त्यांना मिळाल्या अनेक मदमस्त बायका, चकाचक सोफे आणि भिंतीतही स्फोट करणारी स्फोटकं.

त्यांच्यानंतर आल्या त्या केवळ डॉनविषयीच्या अंधश्रद्धा आणि फिल्मी दंतकथा. त्या मानसशास्त्रज्ञांच्या खुर्चीत बसलेल्याही आढळायला लागल्या. त्यांच्या मूर्त्या मिठाच्या आणि जिभा साखरेच्या. असं वाटायला लागलं की ह्या आहेत सुपर मॉल आणि ह्यांची मॉलमत्ता जगभर पुरून ठेवलेली आहे.

आणि आता येताहेत रानटी टेक्नोटोळ्या ज्यांचा त्यांच्या आयांपेक्षा फिल्मांवर विश्वास आहे आणि ज्या रोज रात्री माणसं चिरडतायत आणि सकाळी नाश्त्याला ती ब्रेकफास्ट म्हणून खातायत.

त्यांच्यासाठी हे आहे रेसीपीचं युग आणि खाना - खजाना.

•••

## फिल्डिंग

एक डेंजरस मिशन पार पाडण्यासाठी जिवावर उदार होऊन मी समुद्रात गेलो तर एक मासा मला गिळण्याची वाट पहात होता. मी आकाशात उडालो तर एक पक्षी मला बाण मारण्याची वाट बघत होता. मी जमिनीवर उतरलो तर एक माकड मला तलवारीनं कापण्याची वाट बघत होतं.

स्वतःला वाचवण्यासाठी मी नुस्तीच आग उगाळणाऱ्या ज्वालामुखीत शिरलो तर माझाच श्वास तिथं मला जाळायची वाट पहात होता.

शेवटी तिथून पळून मी वहात राहिलो वाऱ्याबरोबर आकाशात, पृथ्वीवर, समुद्रात, ज्वालामुखीवर तर हवेला नुक्ताच मिळालाय कडक आदेश

"हँग हीम अनटील डेथ"

•••



Scanned with CamScanner

## यात्रा

झाडांना मुळं नसलेल्या ग्लोबल गावात पोहचलो तर रस्त्यांच्या जागी होत्या बिकट पायवाटा ज्या तुडवत चालायला सुरवात केली तर आसपासच्या घरांना पायाच नव्हता.

अशा बिकट अवस्थेत आपल्याला हवं असलेलं घर विचारावं म्हणून तोंड उघडलं तर जीभ गायब. समोरच्याला छापील पत्ता द्यायला म्हणून कार्ड चाचपलं तर खिसा नाहीसा झालेला. शेवटी त्याला मनोमन सॉरी म्हणावं म्हणून झुकलो तर लक्ष्यात आलं समोरच्याला पायच नाहीत. तो सरपटत नाहीसा झाला तेव्हा ओढत गेलो अस्तित्व ! पहिलं घर लागलं बिनपायाचं. मी आत शिरलो तर माणसांऐवजी घरात वावरत होते सात ढग. एका ढगातून मी पाणी काढून प्यालो तर सातही ढग घाबरून पळाले आणि मी घरात एकटाच उरलो.

बसून बसून टिव्ही ऑन केला तर सोपमधली माणसं थेट बाहेर आली आणि त्यांचं त्यांचं जगणं जगायला लागली. त्यांना पुन्हा टिव्हीत पाठवावं म्हणून रिमोट शोधला तर रिमोट गायब.

त्यांना शेवटी भूक लागली म्हणून जेवायची ऑर्डर दिली तर त्यांनी त्यांच्यातल्याच एकाला ठार मारून त्याचं मटण थेट माझ्या ताटात वाढलं. मी घाबरून बाहेर आलो तर आकाशात चंद्र नव्हता. तारेही नव्हते.

अंधारात एकट्याने चालत जाताना स्वतःच्या अस्तित्वाची खात्री पटावी म्हणून स्वतःला चिमटा काढला  तर चिमटीला हवा लागली आणि मागं वळून पाहिलं तर माझंच प्रेत पडलेलं.

निदान ते तरी खरं असेल म्हणून चाचपायला गेलो तर ते उडून थेट गायब. त्याला शोधावं म्हणून दोन पावले टाकली तर मॉनिटर फुटल्याचा खळ्ळ आवाज आणि समोर मला पाहणारे सातशे ढग चौदाशे श्रीधर.

•••

## कुत्ता, वफा आणि हिरा

कुणालाही आरपार करणाऱ्या ह्या काचेतून
प्रथम जातील श्रीमंताची पेज थ्री गाढवं
मग फॅशन हल्वणारी फ्रंट पेज ढुंगणं
आणि मग सर्वात शेवटी भाईची वफादार कुत्री

पलीकडे जे आहे
त्याला स्टीलमॅन करेल त्याच्या पोलादी हातांनी
कडक इस्त्री
सुपरमॅन उपसेल त्याच्यात लपलेला भयाचा समुद्र
बॅटमन फडफडवेल प्रत्येक दिव्यावर रंगीबिरंगी वटवाघळं
आणि सर्वात शेवटी
भाईची कुत्री सांगतील
कुत्रा आणि माणूस ह्यांच्यातील रिअल फरक

तुम्ही कुत्र्यांची वाट निवडलीत
तर ती करणार नाहीत कधीही तुमचा त्याग
ती घेऊन जातील तुम्हाला अशा तारकामंडळात
जिथे प्रत्येक ग्रहावर
सूर्य म्हणून घोडा उगवेल
चंद्र म्हणून तलवार

तुम्हालाही अंतराळवीर म्हणून करिअर करायचय
हे फिक्स झालं
की तुम्हाला देण्यात येईल काळा पोशाख
ज्यामुळे तुम्ही अंधारात कुणाला दिसणार नाही
आणि दिवसा लोग तुम्हाला मॅट्रीक्सचा हिरो समजतील

तुम्ही मराल तेव्हा खात्रीपूर्वक सांगतो
की तुम्ही एकटे मरणार नाही
तुमच्या आसपास असतील
तुमच्या शोकात आंधळी झालेली कुत्री
आणि शवावर तळपेल तुमच्या मृत्यूचा बदला घेऊ पाहणारा
सुडाचा चकमकता हिरा

•••

## फोटो काढताना

फोटो काढताना माझ्या चेहऱ्यावरचं अंडरवल्ड कॅमेऱ्यात येणार नाही ह्याची काळजी घे. प्रथम डोकं बघ, नको हे पोट बघ, नको हे हात बघ, नको हे पाय बघ. ह्यांनी चालत जाऊन दुबईला पोहचता आलं असतं तर तुझ्याजवळ आलोच नसतो. ह्या पोटानं मला अंडरवल्डमध्ये आणलं हा बाळबोध गैरसमज डोक्यातून काढ. पोटाला दोन वेळचं अन्न लागतं आणि मुंबईत ते भीक मागूनही मिळतं.

हा डावा हात थोडा गरम आहे. कामाबाबत कासव ! त्या मानानं हा उजवा ससा आहे ससा ! फार वेगानं हलतो ही मान थोडी मुरगळल्यासारखी वाटते पण मोडल्यासारखी वाटत नाही. पोलिसानं एक दंडुका हाणला होता मरमगळलेल्या हातानं. चेहरा चुरगळल्यासारखा दिसतोय. काय करणार श्वास फुंकून फुंकून थोटकासारखं उरलय नाक आणि डोळे कायम मृत्यू दिसत असल्यासारखे. फाडफाड फोटोत रक्त येत नाही ते बरंय नाहीतर त्यात माझं भय विद्रूप नजर आलं असतं.

एक आहे माझ्या सगळ्या अवयवांची जन्मतारीख एकच आहे.

ह्या क्लोनिंगच्या डुप्लिकेट जगात
हे काय कमी आहे ?

•••

## कोण ?

इनकमिंग कॉल आला
म्हणून मी मोबाईलमध्ये उभाय
तर कॉल करणाऱ्याचा आवाजच मिसिंग

आत चेअर शोधावी बसायला म्हटलं
तर स्क्रीनमधून येतय
पाणीच पाणी

आत माझ्याबरोबर उभी
अवघी पृथ्वी
एक रिंगटोन वाजतोय
पण तो मघाचाच की नवा
कळत नाहीये

कुणीतरी बोलण्याचा प्रयत्न करतय
पण भाषा गहाळ झाल्याने
फक्त त्याची बोलण्याची इच्छाशक्ती
शिगोशिग पसरतीये

कुणीतरी रिवॉल्वर कानफटीला लावल्याचा आभास
कोण बोलतय ?
हत्या की आत्महत्या ?

•••

## आतला आवाज

गांधी रोडवर आतला आवाज ऐकणारा घोडा घेतला आणि बहिऱ्या झालेल्या कानानं सुभाष रोडवर लाल रंगात अवतरलो. लाल रंगाचं जॅकेट बिर्ला फॅशन स्ट्रीटवर खरेदी करून नेहरू रोडवर उडवली पांढरी काळी कबूतरं आंधळ्या झालेल्या बुद्धीबळाच्या पटातून तर ती पुन्हा येऊन बसली सोंगट्या होऊन. त्यांचा नाद सोडून शास्त्रीनगरमध्ये घुसलो एकाची कापडं काढून त्याला मारायला तर तो लेनिन रोडवर लाल रंगाची स्लीपर घालून पळून गेल्याचं कळालं. त्याच्या बायका पोरांना सभ्यतेनं वागवून अे रोडवरची सभ्यता पहात बी रोडवरची संस्कृती न्याहाळत सी रोडच्या कल्चरचं निरीक्षण करत डी रोडवर डी गँगला भेटलो आणि विचारलं खबरी कौन ? तर राजहंस बिल्डिंगमधला वॉचमन म्हणाला जिथे तिथे आपलेच रस्ते आपलीच मंझील ! त्यांना मग शोधमोहिमेत गुंगवून मी मरीन ड्राईववरचा समुद्र चहात बुडवत बुडवत मंत्रालय गाठलं ज्यानं सुपारी दिली होती त्याला खबर द्यावी म्हणून तर तो मंत्रालयात सापडला नुसता गुंई घुंई करत. त्याची वाचा बसली होती मला पाहून. मी मग कानाखाली काढून त्याला ठीक केलं तर तोवर सेक्रेटरी आला आणि मी पळत इंदिरा भवन उतरून भाजप, काँग्रेस अशी सगळी पार्टी ऑफिसेस माझ्या खिशात हलवत सरकत गेलो ध्रुव तारा स्वतःच्याच डोक्यात ठोकून घेऊन राजीव गांधी रोडवर जिथे एक माणूस मासे हवेत जिवंत ठेवत त्यांना सीडीत घालत होता आणि माऊसमधून काढत होता. मी त्याचा फोटो शूट करून निघालो तर माझ्या आतली आशा खचत चालली होती आणि तिला खचताना कसलाही पश्चाताप होत नव्हता ज्याचं माझ्या काळजाला आश्चर्य वाटत नव्हतं. चार पावलं खोल श्वास घेऊन मी आत्मविश्वास गोळा केला तर मोबाईल वाजला आणि वार्ता आली जो लेनिन रोडवर पळून गेला होता तो फोर्ट एरियात पोहोचल्याची. मी मग फुटपाथवरची पुस्तकं चाळत चाळत त्याला शोधलं तर तो हुतात्मा चौकात उभा होता. धापा टाकत स्लीपर्स हातात घेऊन.

मी माझा घोडा बाहेर काढला तर तो पांढरा झाला होता आणि मी आश्चर्यानं चकीत होऊन त्याला थेट काळजात गोळी घातली तेव्हा तो कोसळताना मलाही यायला लागला हार्टअटॅक आणि मी ऐकत राहिलो कोसळताना

आतला आवाज

•••

## मी ?

अरेस्ट वॉरंट निघालं म्हणून कसलाही धोका न पत्करता मी पत्करला पळून जाण्याचा जुजबी मार्ग ! वाटेत दाढी वाढवली. सेफ्टी पिना विकल्या. खोटी नावं धारण करून लोकांना खरी घरं बांधून दिली आणि प्लास्टिक सर्जरी करून काढलं स्वस्त दरात इलाज करणारं हॉस्पिटल. शेवटी एकेदिवशी फार दुखतय म्हणून केल्या स्वतःच्या टेस्टस् डीनच्या खुर्चीत बसून तर रिझल्ट आला एकमतानं "कॅन्सर."

मी बायकापोरात जाऊन मरावं म्हणून हिंदुस्थानात परतलो तर बायकोनं दुसरं लग्न केलं होतं आणि पोरं ऑस्ट्रेलियात जाऊन सेटल झालेली.

शेवटी हे सगळं आपल्याच पापाचं फळ म्हणून उभा राहिलो पोलिसांसमोर आणि म्हणालो "अरेस्ट करा" तर पोलीस म्हणाले, "आम्ही तुला ओळखत नाही. ज्याच्या नावाने अरेस्ट वॉरंट होते त्याला आम्ही सात वर्षापूर्वीच एनकाऊंटरमध्ये मारला."

•••

## श्रीधर तिळवे ह्यांचे साहित्य

## प्रकाशित

### काव्य

१) एका भारतीय विद्यार्थ्याचे उद्गार (पॉप्युलर प्रकाशन)
२) डेकॅथलॉन (शब्दवेल प्रकाशन)
३) क. व्ही. श्रीधर तिळवे (पॉप्युलर प्रकाशन)
४) स्त्रीवाहिनी (शब्दवेल प्रकाशन)
५) चॅनेल : अंडर द वल्ड (शब्दवेल प्रकाशन)

### कादंबरी

१) अ.डॉ.हॉ.का. बा.ना.सु.ना. (शब्दवेल प्रकाशन)
२) आत्मचरित्रातले काल्पनिक क्षण (सौष्ठव दिवाळी २००६) (शब्दवेल प्रकाशन)

### समीक्षा

१) टीकाहरण (शब्दवेल प्रकाशन)

## प्रकाशनाच्या वाटेवर

### काव्य

१) चॅनेल : डिस्ट्रॉयरी (ग्रंथाली प्रकाशन)

### समीक्षा

१) मार्गी आणि देशी (पॉप्युलर प्रकाशन)

श्रीधर तिळवे ह्यांची सर्वसंचारी प्रतिभा आणि सर्वव्यापी बहुआयामी अनुभवविश्व ह्यातून निर्माण होणारी त्यांची कविता अनेक अवकाश आणि काळ ह्यांना कवेत घेते. १९८२ ते १९८७ ह्या कालखंडातील त्यांची डेकॅथलॉन सिरीज आणि १९८७ ते २००६ ह्या कालखंडातील त्यांची चॅनेल्स (वाहिन्या) सिरीज ह्या प्रचंड त्सुनामींचा फील देत राहतात. 'क. व्ही.' ह्या संग्रहातील चॅनेल्समधून जागतिकीकरणाची संक्रमणा टिपणारी त्यांची कविता 'स्त्रीवाहिनी' ह्या संग्रहात घरादारात घुसलेल्या जागतिकीकरणाच्या प्रचंड प्रपाताचा प्रत्यय देत राहते.

''चॅनेल : अंडर द वर्ल्ड'' ह्या संग्रहातील तिळवे ह्यांची कविता जागतिकीकरणाचा अंडरवर्ल्डवर आणि त्यातील माणसांच्या जीवनावर झालेला गुंतागुंतीचा परिणाम सखोलपणे अधोरेखित करते. ''स्त्रीवाहिनी'' ह्या संग्रहात स्त्रीच्या अनुभवविश्वाचे मुलायम व कोमल पदर अत्यंत नजाकतीने व्यक्त करणारी तिळवे ह्यांची प्रतिभा ह्या संग्रहात मात्र एखाद्या धारदार सुऱ्याने अंग सोलावे आणि अंग सोलताना रक्त मात्र गळू देऊ नये अशा अत्यंत त्रयस्थ शैलीने हे अंडरवर्ल्ड व्यक्त करत राहते. काहीवेळा तर स्त्रीवाहिनी लिहिणारा कवी हाच का असा प्रश्न पडावा इतकी ती कठोर आणि निर्जल वाटत राहते. हिंसेबद्दलचा तिचा त्रयस्थ भाव दचकवणारा आहे. ह्या संग्रहातील प्रत्येक कवितेचा निवेदक हा जणू काही दोन तीन मर्डर वा गुन्हे करून मगच कविता लिहायला बसलाय की काय अशी शंका यावी इतकी ही कविता वेगळ्या आवाजात बोलतीये. तिळवे हे त्यांच्या स्वभावानुसार अंडरवर्ल्डमधल्या केवळ कृतीवर फोकस करत नाहीत तर ते त्या कृतींच्या मागे असलेल्या दर्शनात आणि वैचारिकतेतही उतरतात. हे दर्शन, ही सामाजिकता, वैचारिकता प्रत्यक्ष अंडरवर्ल्डमधील माणसांना कळली असेल अगर नसेल पण तिळवे एखाद्या कुशल सर्जनाप्रमाणे ती खोदून खोदून काढत राहतात. अर्थात हे सर्व करत असताना तिळवेंचे अंतिम नैतिक विधान मात्र समाजाचे आणि विश्वाचे कल्याण होवो हेच आहे ह्याचाही प्रत्यय शेवटी येतोच.

गेली कित्येक वर्षे तिळवे ह्यांचे साहित्य हे समीक्षकांना आव्हान बनून उभे आहे. ह्या साहित्याची प्रचंड रेंज चक्कर आणणारी आहे. ह्या संग्रहामुळे रसिकांना आणि समीक्षकांना आणखी एक चक्कर येईल ह्यात काहीच शंका नाही. अंतिमतः ह्या संग्रहामुळे मराठी कवितेचे अधोविश्वही संपन्न होईल इतकी समृद्धी ह्या कवितांत निश्चित आहे.

शब्दवेल

शब्दवेल प्रकाशन